# भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास



लेखक : इतिहासाचार्य वि. का. राजवाडे

**श्रेय**

**टंकन : सौ. श्रेया देवेंद्र रत्नपारखी**

**मुद्रितशोधन : राहुल प्रकाश सुवर्णा**

**मुखपृष्ट : शंकर देसाई**

**ओळख़ : सौ. श्रेया देवेंद्र रत्नपारखी**

**अर्थसहाय्य : विकास प्रकाश जाधव**

## ओळख

पुस्तकाची ओळख श्रीमती श्रेया देवेंद्र रत्नपारखी यांनी लिहिली आहे. या प्रतीत ती तांत्रिक कारणांनी सामिल करता आली नाही. लवकरच ती उपलब्ध करून दिली जाईल.

## प्रकरण १ ले

### स्त्रीपुरूषसमागमसंबंधक कित्येक अतिप्राचीन आर्ष चाली

(१) मित्राला किंवा अथितीला स्वस्त्री संभोगार्थ देण्याची चाल पुरातनकालापसून पाणिनीच्या कालापर्यंत भारतीयांत होती. सध्याच्या आपल्या नीतीप्रमाणे पाहता, ही चाल आपणांस नीतिबाह्य व चमत्कारिक वाटते; परंतु उत्क्रमिष्णु जगतात सर्वच वस्तूंना जंगमत्व असल्यामुळे, नीती ही वस्तुदेखील **उत्क्रमिष्णु** आहे. स्वयंभू, स्थाणु किंवा स्थिर नाही. त्या त्या काळी ती ती चाल नीतिमत्तेची समजली जाते व वाटत्ये इतकेच. तो काळ पालटला व समाजात अंतर्घर्षणाने किंवा बाह्य प्रेरणेने बदल झाले म्हणजे ती जुनी व वहिवाटेतून गेलेली किंवा जात असलेली चाल नीतिबाह्य व चम्तकारिक भासून तिची गणना गर्ह्य वस्तूंत होते. गर्ह्य म्हणजे समाजाला अमान्य एवढाच अर्थ मुळात असतो हे विसरता कामा नये. अश्या गर्ह्य म्हणजे सध्याच्या समाजाला अमान्य व विलक्षण भासणा-या अशा स्वस्त्रीसमर्पणाव्यतिरिक्त इतर कित्येक चाली पुरातन आर्य समाजात, पृथ्वीच्या पाठीवरील इतर प्राचीन व अर्वाचीन कमजास्त रानटी समाजातल्याप्रमाणे प्रचलित होत्या. पैकी काहींचा निर्देश पुढे करतो.

(२) महाभारत व हरिवंशात प्रथम प्रजोत्पत्ती ब्रह्मदेवापासून झाली असे वर्णन आहे. आदिपर्वाच्या ६६ व्या अध्यायांत ब्रह्मदेवापासून वंशावळ दिली आहे. ती अशी :

ब्रह्मा

| मरीचि | दक्ष | X | दक्षा | धर्म |
|---|---|---|---|---|
| । | दक्षाने स्वभगिनी दक्षा इजशी विवाह केला | | | |
| कश्यप | । | | | X |
| X | ५० कन्या | | | |
| दक्ष्याच्या १३ कन्या | | | | दक्षाच्या १० कन्या |

ह्या वंशावळीत (१) पहिली लक्ष्यात घेण्यासारखी बाब म्हटली म्हणजे दक्ष व दक्षा ह्या सख्ख्या बहीणभावंडांचा शरीरसंबंध ही होय. ब्रह्मदेवाच्या उजव्या अंगठ्यापासून दक्ष झाला व डाव्या अंगठ्यापासून दक्षाची भार्या झाली. दक्षाच्या ह्या भार्येचे किंवा बहिणीचे नाव व्यासांनी दिलेले नाही. व्यासांची ही कदाचित नजरचूक असेल किंवा त्यांच्यापर्यंत ही पुरातन कहाणी जेव्हा पोहोचली तेव्हा त्या स्त्रीचे नाव लोककथेतून नष्ट झाल्यामुळे व्यासांनी ते सहजच दिले नसेल. कारण कोणतेही असो, दक्षाच्या बहिणीचे नाव व्यासांच्या महाभारतात नमूद नाही एवढे खरे. समजुतीच्या सौकर्यार्थ ह्या बाईचे नामकरण मी दक्षा म्हणून केलेले आहे. वंशावळीतील (२) दुसरी लक्ष्य बाब अशी की ब्रह्मदेवाचा नातू जो कश्यप त्याने आपल्या १३ चुलतबहिणींशी समागम केला आणि (३) तिसरी लक्ष्य बाब अशी की ब्रह्मदेवाचा पुत्र जो धर्म त्याने आपल्या १० पुतण्यांशी संगनमत केले. तात्पर्य, सख्खी भावंडे, चुलतभावंडे व चुलता-पुतणी यांचे शरीरसंबंध प्राचीन आर्षकाळी होत असत असे इतिहासकार जे महर्षी व्यास ते लिहून ठेवतात. परंपरेने समाजात ज्या लोककथा चालत येतात त्यांचा स्वतंत्रपणे उल्लेख ज्या इतिहास पुराणांतून येतो तो इतिहास वर लिहिल्याप्रमाणे अतिप्राचीन आर्य समाजांत प्रचलित असलेल्या चालींचा निर्देश करतो. भारतहरिवंशादी इतिहासातून उल्लेखिलेल्या ह्या चालींचा निर्देश ऋग्वेदादी ग्रंथांतूनही आढळतो.ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळातील दहावे यमयमी-संवादात्मक सर्वप्रसिद्ध सूक्त एतत्प्रकरणी विचारार्ह आहे. यम आणि यमी अशी दोन सोदर बहिण्भावंडे ऋग्वेदाह्नही

प्राचीन काळी आर्षसमाजात होऊन गेली. यम आणि यमी ह्र व्यक्तिनामे यमाजी व यमूबाई, यमाबाई या रूपाने अद्यापही आपल्या म्हणजे ऋषींचे वंशज जे आपण त्यांच्या समाजात सर्रहा प्रचारात आहेत. यमी आपल्या सोदर भावाला म्हणते की तू माझ्याशी पतिभावाने वाग व आपल्या बापाचा नातू माझ्या ठायी उत्पन्न कर.

ओचित् सखायं सख्या ववृत्यां, पितु र्नयातं आदधीत यमीचे हे म्हणणे यमाला रूचले नाही. तत्रापि यमी यमाला आग्रहाने म्हणते की,

जायेत पत्ये तन्वं रिरिच्याम विचिद गइहेव रथ्येव चक्रा.

इतकेच बोलून यमी गप्प बसली नाही. ती यमाला आणीक असे म्हणाली की, भाऊ असतांना बहीण अनाथ राहिली व दु:ख भोगीत पडली, तो भ्राता कसला ?

किं भ्राताऽ सद्यदानाथं भवाति ।
किमु स्वसा यन्निरऋति र्नि गच्छात् ॥

येथे भ्राता लक्ष्य आहे. भ्रातृ व भर्तृ हे दोन्ही शब्द भृ भरणे , पालन करणे या धातूपासून निघालेले असून दोन्ही शब्दांचा अर्थ पालन करणारा, रक्षण करणारा, भरण करणारा असा आहे. पैकी भ्रातृ हे रूप भर्तृ या रूपाह्लन जुनाट आहे. बहिणीचे म्हणजे भगिनीचे पतिभावाने भाऊ स्मरण करीत, सबब भावांना भ्रातृ हे नाव अतिप्राचीन आर्षकाली पडलेले आहे. स्वसृ हा शब्दही हाच इतिहास सांगतो. स्वान् सरति अनुगच्छति इति स्वसा. स्वत:च्या कुळातील भावांना जी अनुसरते ती स्वसृ. भ्रातृशी शरीरसंबंध ठेवी, व त्या संबंधामुळे ती सनाथ म्हणजे सुसंरक्षित होई हा मूळ इतिहास. तात्पर्य, सोदर बहिणभावांचा शरीरसंबंध अत्यंत प्राचीन आर्षकाली होत असे, या भारतीय ऐतिहासिक विधानाला ऋग्वेदांतील वचनांचा दुजोरा मिळतो. ह्या अतिप्राचीन आर्ष चालीसंबंधाने येथे एक इशारत देऊन ठेवणे युक्त आहे. सख्खे, सोदर, चुलत, चुलतापुतणी, हे शब्द व शरीरसंबंध इतिहासकार जे व्यास व ऋग्वेदकार्जे मंत्रकर्ते ऋषी त्यांच्या काळचे आहेत, मूळ ब्रह्मदेव व दक्षप्रजापती यांच्या अतिप्राचीन काळचे नाहीत. ब्रह्म व दक्ष यांच्या काली भाऊ, बहीण, चुलता, पुतणी संबंध समाजात उद्भवले नव्हते व अर्थात माहीत नव्हते, फक्त स्त्री आणि पुरूष, दोन संबंध तेवढे समाजाच्या लक्षांत आलेले होते. तथापि असाही एक प्राचीन काल होता की ज्या काली हा भेद भिन्नलिंगदर्शक शब्दांनी दर्शविण्याची क्लृप्ती आर्यांना सुचली नव्हती. उदाहरणार्थ, ऋषि: हा शब्द मंत्रद्रष्ट्या स्त्रीपुरूषांना सूक्तांच्या मथळ्यावर लावलेला आढळतो. ऋषि: हे रूप वैय्याकरणदृष्टीने पुल्लिंगी आहे, पण "अस्य सूक्तस्य वाग ऋषि:" या वाक्यात ऋषि हा शब्द स्त्रीलिंगी वाग या शब्दाला जोडलेला आहे. तात्पर्य, स्त्रियांचा आणि पुरूषांचा दर्जा एका अतिप्राचीन रानटी काली समान मानण्याची रीत प्रचलित होती, हे ह्या स्त्रिलिंगी व पुल्लिंगी ऋषि: रूपावरून अनुमानता येते. या अनुमानाशी प्रस्तुत आपणास विषेश कर्तव्य नाही. सध्या आपण एवढेच शोधण्याचा व साधार सांगण्याचा यत्न करीत आहोत की प्राचीन आर्यकाली बहीणभावांचा पतिपत्नीभावाने व्यवहार चालत असे. हा व्यवहार प्राचीन आर्य लोकांतल्याप्रमाणेच तत्समकाली इतर प्राचीन समाजात असलेला आढळतो. पांच सात हजार वर्षांपूर्वीच प्राचीन मिसर समाजांत बहीण भावंडांच्या लग्नाची चाल जारीने प्रचलित होती व ती क्लियोपट्रेच्या कालपर्यंत टिकली होती हे इतिहासात नमूद आहे.

(३) हरिवंशाच्या दुस-या अध्यायात वर्णन आहे की वसिष्ठ प्रजापतीची मुलगी शतरूपा ही वयात आल्यावर आपला पिता जो वसिष्ठ त्याच्याशी प्रेमभावाने राहिली. तसेच याच ग्रंथाच्या दहाव्या अध्यायात असे विधान केले आहे की मनूने आपली मुलगी इला इजशी शरीरसंबंध केला. त्याचप्रमाणे इतिहासाच्या सत्ताविसाव्या अध्यायाय असे लिहिले आहे की जन्हूची मुलगी जी जान्हवी गंगा हिने आपला बाप जन्हू यालाच आपला पति केले ह्या तीन

ऐतिहासिक उदाहरणांचा अर्थ असा की बाप आणि त्याच्या पोटची मुलगी यांचा शरीरसंबंध अतिप्राचीन आर्ष काली होत असे व तो तत्कालीन समाजमान्य असल्यामुळे निंद्य किंवा गर्ह्य मानला जात नसे. ही ऐतिहासिक विधाने निव्वळ भाकडकथा आहेत किंवा वास्तविक घडलेली वृत्ते आहेत या बाबींचा पडताळा व पाहण्याची इतर साधने उपलब्ध आहेत. ऋग्वैदिक अशी एक समजूत सर्वमान्य आहे की सूर्याची दुहिता जी उषा उर्फ सरण्यू तीच सूर्याची भार्या होती. यास्ककृत निरुक्तांच्या पाचव्या अध्यायाच्या सहाव्या खंडात उषा: सूर्या वृषाकपायी सरण्यू: ही चार उषसची नावे दिलेली आहेत.

प्रजापति वै स्वां दुहितर मध्यायत । ( ऐ. ब्रा. पं. ३ अ. ३ खंड ३३ )

ह्या ऐतेरेय ब्राह्मणवचनांत हाच अर्थ स्पष्ट सांगितला आहे. पितृदुहितृसंबंधाचा हा वैदिक पुरावा झाला. स्मृतिग्रंथातही ह्या चालींची म्हणजे बापाचा स्वत:च्या मुलीशी संबंध होण्याची ज्ञापके आढळतात.. वशिष्ठसंहिता ही एक जुनाटातली संहिता म्हणजे स्मृतिग्रंथ समजतात. ह्या संहितेत कानीन म्हणून ज्याला म्हणतात त्या पुत्रसंबंधाने खालील वाक्ये आली आहेत :-

"कानीन: पंचम: । या पितृगृहे
असंस्कृता कामादुत्पादयेत
मातामहस्य पुत्रो भवतीत्याह्व: ।
॥ अथाप्युदाहरति ॥

अप्रत्ता दुहिता यस्य पुत्रं विंदति तुल्यत: ॥
पुत्री मातामहस्तेन दद्यात्पिंडं हरेद्धनं ॥ १॥

पित्याच्या घरात राहून विधियुक्त विवाह न होता कन्येला तुल्य जातीच्या पुरूषाकडुन जो पुत्र होईल तो पुत्र त्या कन्येच्या बापाचा म्हणजे मातामहाचा शास्त्र म्हणजे रूढी समजते. त्या पुत्राने पिंड द्यावे व धनाचा उपभोग घ्यावा. येथे समाजशास्त्रदृष्ट्या असा प्रश्न उद्भवतो की तुल्य जातीच्या परपुरूषाकडून लग्न न झालेल्या स्वकन्येच्या ठयी जो पुत्र उत्पादन केला तो पुत्र त्या कन्येच्या बापाचा काय म्हणून शास्त्र किंवा रूढी ठरावी ? तो कानीन मुलगा ज्या परपुरूषाकडून झाला त्याचा वास्तविक ठराव व आपल्या आज्याचा म्हणजे आईच्या बापाचा नातू ठरावा. परंतु कानीन मुलगा परपुरूषाचाही न ठरता किंवा आज्याचा नातूही न ठरता, आज्याचा धर्मोत्पादित पुत्र ठरे व त्या पुत्राची प्रत्यक्ष आई त्याची बहीण ठरे. ह्या चमत्कारिक चालीचा अर्थ काय ? समाजात ही समजूत व रूढी व हा धर्म काय म्हणून मान्य झाला ? सध्याच्या आपल्या समाजात असा प्रकार निंद्य समजला जाईल. परंतु वशिष्ठसंहिताकाली तो अधर्म्य व निंद्य समजला जात नसे. ह्याचे कारण काय ? ह्याचे कारण एकच आहे आणि ते हे की वसिष्ठकालीन समाज अशा एका पुरातन समाजाचा वंशज होता की ज्या समाजात पिता आपल्या स्वत:च्या कन्येच्या ठायी संतती उत्पन्न करी. सर्वच समाजात ही चाल त्या पुरातनकाली प्रचलित असल्याकारणाने कोणी कोणाला नावे ठवीत नसत. म्हणजे त्या चालीला अधर्म्य व निंद्य समजत नसत. वसिष्ठोत्तर मन्वादिसंहिताकाराना व मन्वादिसंहिताकालीन आर्यसमाजांना स्वकन्येच्या ठायी परपुरूषाकडून झालेल्या मुलाला कन्येच्या बापाने आपला मुलगा म्हणावा ही चाल अप्रशस्त व अस्वाभाविक वाटून त्या कानीन मुलाचे पितृत्व उत्पादक परपुरूषाकडे किंवा कन्येच्या भावी पतीकडे येणे प्रशस्त वाटलेले उत्तरकालीन स्मृतिग्रंथातून नमूद केलेले आहे. त्या नमूदीचा प्रपंच प्रस्तुत प्रकरणाचा विषय नसल्यामुळे , तत्संबंधाने जास्त लिहिण्याचे येथे प्रयोजन नाही. येणेप्रमाणे अतिप्राचीन आर्यसमाजात पितृदुहितृशरीरसंबंध एका काली प्रचलित होता हे विधान स्मृतिग्रंथातील वचनांनीही सिद्ध होत आहे. एकूण

इतिहास, वेद व स्मृति . किंवा इतिहास, श्रुती व स्मृती या तिहीतील वचनांचा आधार या चालीच्या अस्तित्वाची सिद्धी करण्यास उपलब्ध आहेत. सबब, प्राचीन आर्यलोकात ही चाल प्रचलित होती या विधानाच्या पोषणार्थ जास्त पुरावे गोळा करण्याचा किंचिन्मात्रही आवश्यकता राहिली नाही.

(४) वर जी ही भारतीय, हरिवंशीय, वैदिक व स्मार्त शरीरसंबंधक उदाहरणे नमूद केली ती सर्व एका स्त्रीशी एकाच बापाचा किंवा भावाचा शरीरसंबंध दाखवण्यापुरती झाली. अनेक सपिंड पुरूषांचा एकाच सपिंड स्त्रीशी संबंध दाखविणारी वाक्येही इतिहासातून सापाडतात. हरिवंशाच्या दुस-या अध्यायात असे लिहिले आहे की, दहा प्रचेत्यांनी व त्यांचा पुत्र सोम याने सोमाची मुलगी मारिषा तिचे ठायी आपापली तेजे घालून दक्ष प्रजापती निर्माण केला. पितृदिहितृसंबंधाचे तर हे उदाहरण आहेच.. शिवाय आजा व नात यांचा संबंध या उदाहरणात दाखविला आहे, इतकेच नव्हे तर दहा आजे व एक बाप यांचा संबंध बापाच्या मुलीशी झाल्याचे लिहिले आहे. याच अध्यायात पुढे असे वर्णन आहे की सोमाचा मुलगा किंवा दौहित्र जो दक्षप्रजापती त्याने आपल्या सत्तावीस मुली आपला बाप किंवा आजा जो सोम त्यास प्रजोत्पादनार्थ दिल्या. येथेही आजाचा व नातींचा शरीरसंबंध झाल्याचा दाखला मिळतो. हरिवंशाच्या तिस-या अध्यायात नमूद केले आहे की ब्रह्मदेवाचा पुत्र दक्ष याने आपली मुलगी ब्रह्मदेवाला दिली व तिजपासून प्रसिद्ध नारद झाला. हाही संबंध वरच्याच वर्गातला आहे. हे विचित्र संबंध वर्णिलेले, आणि तेही इतिहासकार व्यासांनी व वैशंपायनांनी वर्णिलेले ऐकून , सध्या आपल्याला जे आश्चर्य वाटते तेच आश्चर्य जनमेजय राजाला पाव हजार वर्षांपूर्वी वाटले आणि आपन जो प्रश्न करू तोच जनमेजयाने वैशंपायनांना केला. जनमेजय विचारतो की, वैशंपायन हो ! हे असले अधर्म्य संबंध झालेले आपण इतिहास म्हणून वर्णिता याचा अर्थ काय ? तेव्हा जनमेजयाचे वैशंपायनांनी असे समाधान केले की पूर्वयुगी हे असले संबंध होणे हाच धर्म उर्फ समाजरूढी सर्वमान्य होती. वर्तमानकाली समाजशास्त्रदृष्ट्या आपण जे उत्तर देऊ तेच उत्तर वैशंपायनांनी दिले. वैशंपायनाला, भीष्माला व व्यासाला पूर्व इतिहास म्हणून या कथा परंपरेने माहीत होत्या व पुरातन इतिहास म्हणून त्यांनी त्या ज्ञानत: नमूद करून ठेवल्या आहेत, अज्ञानाने काहीतरी भोळसाटपणा केलेला नाही. हर्यश्व व युवनाश्व असे दोघे भाऊ होते. व त्या दोन भावांना एक बहीण होती. हर्यश्वाचा मुलगा जो यादववंशस्थापक यदु ह्याने आपल्या बापाच्या बहिणीच्या पाच मुलींशी शरीरसंबंध केला ( हरिवंश , अध्याय २३७ ). येथे आतेबहिणीशी संबंध झाला. वरील सर्व अवतरणांचा मथितार्थ असा की प्राचीन काळी आर्यसमाजात सख्खी बहीण, चुलत बहीण, नात, सख्खी मुलगी व आतेबहीण यांच्याशी शरीरसंबंध आर्ष लोक करीत असत. यात बरेच नातगोत गोविले गेले हे खरे; परंतु ह्याह्न आश्चर्यकारक चाली महाभारतात वर्णिल्या आहेत. महाभारताच्या आदिपर्वाच्या ४५ व ४६ या अध्यायांत अर्जुन व ऊर्वशी यांच्या भेटीचा वृत्तांत दिला आहे. ऊर्वशी ही पौरववंशाची जननी आणि अर्जुन हा तिचा वंशज. असे असून भेटीच्या वेळी ऊर्वशीने अर्जुनाजवळ भोग्ययाचना केली ती अर्जुनाने फेटाळली; कारण अर्जुनाचा पूर्वज जो ऊर्वशीपती पुरूरवा त्याच्या काळच्या नीतींत व अर्जुनाच्या काळच्या नीतींत बहुत अंतर पडून प्रगती झाली होती. ऊर्वशी ही जुनाट स्त्री पुराणप्रिय असल्यामुळे ती पुरातन नीतीला अनुसरणारी होती. ती अर्जुनाला म्हणते, “ मला तू असा फेटाळू नको,पुरूच्या वंशातील आमचे जे पुत्र व पौत्र येथे इंद्रलोकी येतात ते आमच्याशी रमतात आणि त्यांना कोणी दोष देत नाही, तेव्हा तूही माझ्याशी रमलास तर तुलाही त्यात काही दोष नाही.” अशी पुरातन नीति यद्यपि ऊर्वशीने आपल्या वंशजाला सांगितली तत्रापि नीतिसुधारक अर्जुनाने ती मान्य केली नाही. तेव्हा संतप्त होऊन ऊर्वशीने अर्जुनाला शाप दिला की, तू माझा आदर केला नाहीस सबब वर्षभर षंढ होशील. हे उदाहरण मातृगमनाचे किंवा मातामहीगमनाचे किंवा प्रमातामहीगमनाचे, असे वाटेल त्याचे समजावे; कारण, अर्जुन हा इंद्राचा मुलगा व ऊर्वशी ही इंद्राची भोग्य अप्सरा, या दृष्टीने ऊर्वशी अर्जुनाची माता ठरते; आणि अर्जुनाचा पूर्वज जो पुरूरवा त्याची स्त्री म्हणून प्रमातामही ठरते. तात्पर्य मात्रागमनाची चाल पुरातन भारतीयांत होती. त्या काली माता, पिता, भाऊ, बहीण, नात, मुलगी, चुलतबहीण, आतेबहीण वगैरे नाती उत्पन्न झालेली नव्हती. यावरून अत्यंत पुरातन भारतीय पूर्वज किती रानटी स्थितीत होते त्याचा वर्तमानकालीन कित्येक

रानटी समाजांशी तुलना करिता, अंदाज करता येतो.

The chippeways frequently cohabit with their mothers and oftener still with their sisters and daughters. Kadiaks unite indiscriminately, brothers with sisters and parents with children. The caribs married at the same time a mother and a daughter. The ancient Irish married, without distinction, their mothers and sisters ( Letourneau, page 65-66).

[ चिपवे काही वेळेला आपल्या आयांच्या बरोबर व पुष्कळदा आपल्या भगिनी व मुली यांचे बरोबर संभोग करीत. कादिकांच्यात अनिर्बंध संभोग असे. भाऊ-बहिणींचा व बाप लेकींचा. कारीब एकाच वेळी आई आणि मुलगी यांचेशी विवाह करतात. आयर्लंडचे जुने रहिवासी अनिर्बंधपणे आपले आया व बहिणी यांचेबरोबर विवाह करीत [ लिटोर्न्यू-पृ ६५-६६].

चिपवे, कारीब वगैरे लोक रानटी म्हनून प्रसिध्द आहेत. त्याच दर्जाचे महाभारतात वर्णिलेले हे प्राचीन आर्ष लोक होते, असे म्हणावे लागते. आई, मुलगी, बहीण यांच्याशी व्यवाय करणारे असे लोक केवळ प्राचीन आर्षसमाजातच तेवढे होते असे समजू नये. खुद्द कौरवपांडवांच्या काली भारतवर्षात भारतीय म्हणून गणले जाणारे काही समाज प्राचीन आर्षसमाजाइतके किंवा त्यांच्याहूनही विचित्र होते. कर्णपर्वाच्या ४० पासून ४६ पर्यंतच्या अध्यायात कर्ण  व शल्य हे एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढीत आहेत. त्यात शल्याला वाक्प्रहार करताना शल्याच्या राज्यांतील जे आहीक, आरट्ट, पांचनद व भद्र देश तेथील लोकांच्या निंद्य-म्हणजे आर्यावर्तातील लोकांच्या दृष्टीने निंद्य-चालीसंबंधाने कर्ण म्हणतो, “ शल्या, तुझ्या मद्र देशांत पिता, पुत्र, माता, सासू, सासरा, मामा, जावई, मुलगी, भाऊ, नातू व दुसरे बांधव, सोबती, पाहुणे व दासदासी ही सर्व सरमिसळ व्यवाय करतात. त्या देशातील स्त्रिया कोणत्याही पुरूषाशी स्वेच्छेने समागम करतात, मग ते पुरूष त्यांच्या ओळखीचे असोत नसोत. स्त्रिया भलतीसलती गाणी गातात. मद्रदेशाच्या सान्निध्याने गांधार देशातीलही चाली बिघडल्या. मद्र देशातील स्त्रिया दारू पितात व वस्त्रे टाकून नागव्या नाचतात.  स्त्रिया उंट किंवा गाढव यांच्याप्रमाणे नैसर्गिक उत्सर्ग करतात. मद्र देशांतील स्त्रियांपाशी कोणि मद्य मागितल्यास त्या कुले खाजवीत खाजवीत मद्य देणार नाही, वाटले तर पति किंवा पुत्र देऊ म्हणून म्हणतात. वाहीक देशात जारज प्रजेचे प्रमाण अतिशय आहे. शूद्रांपासून अन्य स्त्रियांच्या ठायी झालेले ब्राह्मण तेथे आहेत. आरट्ट देशात, बहिणीच्या मुलांना वारसाहक्क प्राप्त होतो, पोटच्या पोरांना नाही. वाहिक देशात म्हणजे सध्याच्या पंजाबात मनुष्य प्रथम ब्राह्मण बनतो, मग क्षत्रिय होतो. नंतर वैश्य होतो., मग शूद्र होतो, शेवटी नापित होतो. पुन: ब्राह्मण बनतो व ब्राह्मणाचा शेवटी गुलाम बनतो. मद्र देशातील कुमारिका निर्लज्ज व अनाचारी असतात. पांवन देशातील लोक कृतयुगांत सुद्धा अधर्माचरण करणारे ठरतील. या शेवटल्या वाक्याचा अर्थ असा की, कृतयुगात सबगोलंकार असल्यामुळे त्या काली सर्वच अधर्म होता; अशा अधर्मी युगातही पांचनद अधर्मी ठरतील. शेवटी कर्ण म्हणतो की, वाहीकलोक भूतलाला लांछन आहेत ! मद्रलोक गुरूपत्नीगमन व भ्रूणहत्या करतात असेही कर्ण म्हणतो. मद्र व वाहीक देशांत ही निंदा एकट्या कर्णानेच केली आहे असे समजू नये. शांतिपर्वाच्या ३२८ च्या अध्यायात नारद व्यासाला सांगतात की, पृथ्वीवर वाहीक लोकांचे वास्तव्य पृथ्वीला कमीपणा आणणारे आहे.  मद्र व वाहीक इत्यादी निंद्य देशांच्या प्रगतीला कर्ण प्रस्थल, गांधार, आरट्ट, खस, वसाति सिंधुसौविर, कारस्कर, महिषक, कालिंग, केरल, कर्कोटक, वीरक या देशांनाही बसवितो.पैकी कारस्कर, महिषक, केरल, कर्कोटक व वीरक हे दक्षिणेकडील देश आहेत. वीरक म्हणजे बहुश: करवीरक असावे. या निंद्य देशांची गणना येथेच संपली नाही. त्यात सुराष्ट्राचीही कर्ण करतो. कर्णमते सुराष्ट्रांतील लोक संकरवृत्ति आहेत ( कर्ण-४५ ). देशांची नावनिशी संपविताना कर्ण म्लेंच्छ समाजांना विसरला नाही. तो म्हणतो, म्लेंच्छ मानवजातीला लांछन, औष्ट्रिक म्लेंच्छांना लांछन, षंढ औष्ट्रीकांना लांछन, आणि राजपुरोहित षंढांना लांछन ( कर्ण -४५ ). म्लेंच्छ म्हणजे अस्पष्ट भाषा बोलणारे भारतवर्षातील व भारतबाह्य देशांतील लोक. हा म्लेंच्छसमाज कर्णकाली स्त्रिपुरूषसंबंधात अत्यंत अनाचारी होता. पाच हजार वर्षापूर्वीचा कर्ण तेवढा म्लेंच्छांची निंदा करतो असे नाही, आधुनिक प्रवाश्यांनी, पुराणेतिहाससंशोधकांनी व प्राचीन ग्रीक व रोमन इतिहासकारांनी ह्या लोकांची अशीच वर्णने केलेली आहेत.

Yazidies, a sect od Arabs, unite in the darkness without heed as to adultery or incest ( Letourneau 44 ) Justin and Tertullian tell that the Parthians and Persians married their own mothers, In ancient Persia, religion sanctified the union of a son with his mother.

[ व्यभिचार किंवा आप्तसंबंध याचा विचार न करता याझीदी, अरबातील एक पंथ, अंधारात संभोग करतात ( लिटोर्न्यू-४४ ). जस्टीन आणि टेट्र्युलियन असे सांगतात की, पार्थियन आणि पर्शियन आपल्या स्वत:च्या आईशी विवाह करीत. जुन्या पर्शियात मुलगा आणि आई यांच्या विवाहाला धर्माने मान्यता दिली होती.]

ही वर्णनमाला आणीक हवी तितकी वाढविता येईल. “व्यभिचारियासी  मल्याळ देश" म्हणून मुक्तेश्वर आपल्या भारतात मल्याळ उर्फ मलयदेशाची कुत्सा करतो. वर्तमानकाळी महाराष्ट्रात कोल्हाटी म्हणून लोक आहेत, त्यांच्यातील स्त्रियांची व नीतीची पूर्ण फारकत असलेली आढळून येते. येणेप्रमाणे म्लेंच्छ लोकांच्या नितीसंबंधाने सर्वसामान्य हकिकत आहे. पैकी कर्णाचा कटाक्ष, गंधार, मद्र या देशांच्या बाजूच्या म्लेंच्छ लोकांवर मुख्यत: असलेला दिसतो. सभापर्वात (अध्याय ३१ ) महिष्मतीनगरीत स्त्रिया स्वच्छंद वागतात म्हणून वर्णन आहे. उत्तरकुरूंत, म्हणजे जेथून कौरवपांडव मूळ आले त्या देशांत, स्त्रिया स्वच्छंदाने वागतात आणि नरनारींमध्ये तत्संबंधाने मत्सरबुद्धी वास करीत नाही, असे अनुशासन पर्वाच्या १०२ व्या अध्यायात वर्णन आहे,

(५) महाभारतात व हरिवंशात वंशोत्पत्तीसंबंधक जे पुरातन इतिहास-पुरातन इतिहास शब्द माझा नाही. व्यासांचा आहे - दिले आहेत त्यांच्यावरून भारतीय समाजाची पुरातन नीतिमत्ता आपल्या सध्याच्या नीतिमत्तेच्या दृष्टीने कोणत्या दर्जाची होती, हे आपणास ब-याच खुलाशाने सांगता आले. हा खुलासा ह्या पुरातन इतिहासांच्या आधाराने आणीकही विस्तृत करता येण्यासारखा आहे. मनुष्य हा वंशाने पाशव आहे. व प्राथमिक वन्य मनुष्यांत काही काही बाबतीत पशूंचे आचरण दृष्टीस पडल्यास नवल करावयास नको. आदिपर्वाच्या  ६३ व्या अध्यायात पराशरऋषी व सरस्वती उर्फ मत्स्यगंधा निषादी यांचा समागमाचा वृत्तान्त दिला आहे. त्यात पराशराने सत्यवतीशी उघड्यात समागम केल्याचे लिहिले आहे. आपले कृत्य दिसू नये म्हणून पराशराने भोवताली योगमायेने अंधार उत्पन्न केला म्हणून कवीने पराशराची पाशवीवृत्ती झाकण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु थोडे सूक्ष्म लाहिले असता त्यात विशेषसा राम दिसत नाही; कारण अतिप्राचीन आर्यलोकांत दिवसाढवळ्या उघड्या हवेत स्त्रीपुरूष समागम होण्यात काही नीतिभंग होतो असे वाटत नसल्याचा पुरावा आहे. उतथ्यपुत्र  दीर्घतपाने सर्व लोकांसमक्ष स्त्रीसमागम करण्यास आरंभ केला, असे वर्णन आदिपर्वाच्या १०४ व्या अध्यायात आढळते. आदिपर्वाच्या ८३ व्या अध्यायात, गुरूदारेशी रत होणारे आणि पशूंसारखे ज्यांचे आचारविचार आहेत, अशा म्लेंच्छ लोकांचे गुणवर्णन केलेले आढळते. सर्व लोकांसमक्ष उघड्यात स्त्रीसमागम करण्याची चाल हिंदुस्थानात कोठे कोठे अवशिष्ट असलेली अर्वाचीन प्रवाशांनी नमूद करून ठेवली आहे. रणजितसिंग हत्तीच्या अंबारीत सर्वांसमक्ष स्त्रीसमागम करी म्हणून ज्याकूमो लिहितो. पुण्यात बाजीराव रघुनाथ ह्यांची घटकंचुकी सर्वप्रसिद्ध आहे. निवडक स्त्रीपुरूष रंगमहालात जमून स्त्रियांच्या चोळ्या एका घागरीत घालीत व ज्या पुरूषाला ज्या बाईची चोळी सापडे तिशी तो सर्वांदेखत रममाण होई. या पाशव खेळाला घटकंचुकी म्हणत. ही घटकंचुकी कर्नाटकात पाचपन्नास वर्षांपूर्वी प्रघातात होती. घटकंचुकीत  वडील, धाकुटे किंवा नाते हा भेद पाळीत नसत ही बाब लक्षात घेण्यासारखी आहे. असो. प्राचीन आर्ष समाजाच्या जोडीला प्राचीन शक, अर्वाचीन टाहीटियन व प्राचीन तामील लोकांना बसविता येईल. हिरोडोटस एस्किथियन (Skythian) म्हणजेच शक लोकासंबंधाने लिहीतो की, When one of them desires a woman, he suspends his quiver in front of his chariot and tranquily unites with her. (  जेव्हा त्यापैकी कोणाला स्त्री-संभोगाची इच्छा होई तेव्हा ते आपला भाता रथाला लटकावून शांतपणे संभोग करीत ). हाच इतिहासकार तामील लोकांसंबंधाने नमूद करतो की, They coupled as publicly as beasts. ( ते जनावरांच्याइतक्याच उघडपणे संभोग करीत). तात्पर्य, प्राचीन शक किंवा तामील किंवा अर्वाचीन टाहीटियन लोकांची जी वन्यावस्था होती व आहे तीच निकृष्ट दशा प्राचीन आर्य लोकांची असलेली महाभारतावरून दिसते. ही रानटी चाल जसजशी मोडत गेली तसतसा तद्विरुद्ध धर्मही निर्माण होत गेला. मैथुन

एकान्तात करावे, म्हणून शांतिपर्वाच्या १९३ व्या अध्यायात व इतर स्मृतिग्रंथांत  मुद्दाम सांगितलेले आहे. लोकान्तात मैथुन करण्याची चाल कधीतरी अस्तित्वात असल्याबिगर, ते एकान्तात करण्याचा निर्बंध घालण्याची आवश्यकता भासली नसती. आर्ष लोकांत लोकान्तात मैथुन करण्याची चाल असल्याचा सुगावा अयोनिज या शब्दात सापडतो. द्रौपदी; सीता वगैरे अनेक व्यक्तिंची उत्पत्ती अयोनिज झाल्याची वर्णने आहेत. अयोनिज या शब्दाचा अर्थ काय ? अयोनिज म्हणजे स्त्री-योनिपासून न झालेले अपत्य असा उत्ताना अर्थ करतात, परंतु असा अर्थ करणे समंजस नाही. स्त्रीयोनिव्यतिरिक्त प्रजा होणे ज्या अर्थी अशक्य आहे त्य अर्थी हा उत्तानार्थ खरा अर्थ नव्हे, हे स्पष्टच होते. अयोनिज या शब्दाचा खरा अर्थ खालीलप्रमाणे आहे. योनी या शब्दाचा अर्थ गृह असा मुळात आहे व वेदांत या अर्थाने हा शब्द योजिलेला आढळतो. आरोहंतु जनयो योनि अग्रे ( तैत्तिरीय आरण्यक प्रपाठक ६, अनुवाक १ ). स्त्रिया आधी घरात शिरोत, असा अर्थ आहे. योनिज म्हणजे घरात जन्मलेले मूल व अयोनिज म्हणजे घरात न जन्मलेले म्हणजे घराबाहेर जन्मलेले. घराबाहेर जन्मलेले म्हणजे कोठे जन्मलेले ? तर यज्ञमंडपात जन्मलेले. ऋषी वामदेव्यव्रते करीत आणि ही व्रते यज्ञभूमीवर करीत असताना कोण्याही स्त्रीने संभोगेच्छा दर्शविली असता ती तेथल्या तेथे पूर्ण करीत. वामदेव्यव्रताचे  मंत्र छांदोग्योपनिषदात दिले आहेत. असल्या या व्रताच्या वेळी जे मूल जन्मास घातले गेले त्या मुलास अयोनिज मूल म्हणजे घराबाहेर जन्मास घातलेले मूल म्हणत. यज्ञभूमीवर उघड्यात संभोग केल्याची उदाहरणे महाभारतात आहे. तात्पर्य, आर्ष लोकांत उघड्यात समागम करण्याची चाल एके काळी होती व तिचा अवशेष म्हणून यज्ञभूमीवर वामदेव्यादी व्रते करताना समागम करण्याची चाल शिल्लक राहिलेली दिसते.

(६) संकीर्ण समागम व उघड्यात समागम या दोन रानटी चालींप्रमाणे प्राचीन आर्षलोकांत तिसरी एक वन्य चाल आहे. आपल्या समाजाह्रून कर्तृत्वाने, सामर्थ्याने व ऐश्वर्याने जो समाज अतीच अती श्रेष्ठ असेल, त्या समाजातील पुरूषांशी स्वस्त्रियांचा समागम झाल्यास भूषण मानणारे  काही निकृष्ट समाज नुकते परवापरवापर्यंत होते.

In Tasmania it was thought an honour for women to prostitute temselves to Europeans, who were ennobled in the eyes of the natives by the prestige of their superiority ( Letourneau).

( टास्मानियात युरोपियन पुरूषांबरोबर संबंध असणे हा स्त्रीचा मोठेपणा मानला जाई; कारण तद्देशीय लोकांच्या दृष्टीने त्यांच्या उत्तमपणामुळे त्यांना श्रेष्ठत्व प्रापत झालेले होते.) टास्मेनियन लोकांना जो युरोपियन लोकांचा दरारा, आदर, प्रेम वाटे तसलाच दरारा, आदर व प्रेम आर्ष मानवांना देव म्हणून कोणी लोक होते त्यांचे वाटे. देवांनी जर कोणा मानव स्त्रीच्या ठायी गर्भाधान केले, तर आपले भाग्य शिखरास पोहोचले असे प्राचीन आर्षांना वाटे. ह्या समजुतीचे प्रमाणक असे दाखले भारतात व हरिवंशात इतके आहेत की त्याचे परिगणन करण्याची अपेक्षा विशेषशी आपल्या देशात कोणाला वाटणार नाही. इंद्रापासून, यमधर्मापासून, नासत्यांपासून, अग्नीपासून, वायूपासून व इतर देवांपासून आर्ष स्त्रियांना संतती झाल्याच्या कथा विपुल आहेत. देवसमाजासंबंधाने आर्ष लोकांना इतका काही दरारा वाटे की आर्ष लोकांत स्त्री अपत्य जन्मले की त्या वर देवांचा हक्क ते प्रथम कबूल करीत. स्त्री-अपत्य दोन वर्षांचे होईपर्यंत तिच्यावर अमुक देवाचा हक्क, चार वर्षाचे होईपर्यंत अमुक देवाचा हक्क आणि सहा वर्षाचे होईपर्यंत अमुक देवाचा हक्क असे जन्मापासून आर्ष स्त्रियांवर देवांचे अग्र हक्क असत.

सोम: प्रथमो विवेदे गंधर्वो विविद उत्तर: । ऋग्वेद
तृतीयो अग्निष्टे पति स्तुरीयस्ते मनुष्यजा: ॥ १०।८५।४०

हा हक्क कसा उत्पन्न झाला याचा अंदाज येतो. देवसमाज व आर्षसमाज हे दोन प्रतिवेशिक समाज असत. देवसमाज बलिष्ठ पडल्यामुळे त्याने आर्ष समाजाला आपल्या कह्यात आणले आणि आर्षांच्या सर्व चीजवस्तेवर व मालमत्तेवर ताबा मिळवला. आर्षाची मुख्य मालमत्ता म्हणजे त्यांच्या गुलामवजा स्त्रिया. त्यांच्यावरही देवांचा ताबा बसला, आणि तो ताबा इतका प्रखर बसला की स्त्री जन्मली की तिच्यावर कोणातरी देवाचे स्वामित्व चालू होई.  देवांच्या या अग्रहक्कातून मुक्त व्हायचे म्हणजे त्यांना आर्ष लोक नुसते हिरवे धान्य नव्हे तर उत्तम भाजलेल्या धान्याच्या लाह्या

व साचलेले तूप देत व आपल्या मुली देवांच्या ताब्यातून सोडवून आणीत. हा देवांचा अग्रोपभोगाचा हक्क म्हणजे Medieval feudal युरोपातील Prelibation चा हक्क होय. Prelibation म्हणजे अग्रोपभोगाचा हक्क. This right of Prelibation has been in use in many fiefs and until a very recent epoch, certain lords of the Netherlands of Prussia, and of Germany still claimed, in our own days. In a French Titledeed of 1507 we read that the Count d'Eu has the right of Prelibitionin the said place when anyone marries. Even ecclesiastics claimed the rightin their quality as feudal Lords ( Letourneau ).

( हा अग्रोपभोगाचा हक्क अनेक सरंजामी वतनात चालू होता. अगदी आधुनिक कालापर्यंत आणि प्रशियाच्या नेदर्लंडमधील आणि जर्मनीतील काही लॉर्ड आजही हा आपला हक्क असल्याचे सांगतात. १५०७ सालच्या फ्रान्समधील एका सनदेत काउंट ड'ल्यू याला त्या भागात होणा-या विवाहांत अग्रोपभोगाचा हक्क असल्याचा उल्लेख आहे. धर्मगुरूसुद्धा सरंजामदार या नात्याने हा हक्क असल्याचा दावा करीत.

युरोपातल्या धर्माचार्याप्रमाणे आपल्या इकडे वल्लभाचार्यांना हा अग्रोपभोगाचा हक्क परवापरवापर्यंत गुजराथेत लोक देत असत आणि सध्या हक्काची बजावणी यद्यपि अक्षरशः होत नसली, तथापि वल्लभपंथीयांची ह्या हक्काला मानसिक अनुमति आहे. युरोपात अग्रोपभोगाचा हक्क परवापर्यंत होता हे पाहिले म्हणजे प्राचीन आर्षसमाजात पाचसहा हजार वर्षांपलीकडे तो असल्यास आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. देवलोक व देवसमाज नष्ट झाल्यावर, स्त्रियांचे अर्पण करण्यास मनुष्यदेहधारी देव राहिले नाहीत. परंतु या अवधीत वीरपूजेचा पगडा आर्षांवर असून इंद्रादी देवांना व वीरांना आर्ष लोक ईश्वर समजू लागले व या ईश्वरांना स्त्रिया प्रथम अर्पण करू लागले. आर्ष ह्या चालीचा अवशेष अद्यापही आपणा महाराष्ट्रीयांत व इतर भारतीयांत जातीने प्रचलित आहे. विवाहात लाजाहोम म्हणून एक होम करीत असतात. या होमाची सर्व प्रक्रिया वधूची देवांच्या हक्कांतून मुक्त करण्यासंबंधीची आहे.. आश्वलायन गृह्यसूत्रांतून ही सर्व प्रक्रिया क्रमवार येथे देतो व समाजशास्त्रदृष्ट्या तिचा अर्थ करून दाखवतो. आर्यमन, वरूण आणि पूषन या तीन देवांचा ताबा उर्फ पाश वधूवर होता. त्या पाशांतून तिला मुक्त करण्याचा वराने संकल्प केला. तेव्हा प्रथम देवांच्या साक्षात कैचीतून वधूला काढून आणून्वराने तिला एका बळकट शिळेसन्निध आणिले आणि म्हटले की इमं अश्मानं आरोह, अश्मेव त्वं स्थिरा भव, सहस्व पृतनायतः, अभितिष्ठ पृतन्यतः ॥ आश्वलायनगृह्यसूत्र, अ. १, खंड ७, सूत्र ७. ह्या शिळेवर चढ, शिळेप्रमाणे स्थिर हो आणि शत्रूंना हतप्रभ कर व तोंड दे. वराने आपल्या ताब्यातून काढून वधू नेलेली पाहून देव क्रोधायमान झाले व ते वधूवरांवर चालून आले. तेव्हा वधूचा भाऊ जवळ सहाय्यार्थ होता. त्याने मध्यस्थी करून गोष्ट हाणामारीपर्यंत येऊ दिली नाही. त्याने रदबदली करून वराने पळविलेल्या वधूच्या मोबदला भाजलेल्या लाह्या दंड म्हणून देण्याचे कबूल केले व देवांच्या कचाट्यातून बहिणीची मुक्तता केली. ह्या दंडालाच अवदान म्हणून पारिभाषिक नाव आहे. ही तडजोड करण्याला वधूचा भाऊ होता. म्हणून प्रसंगी तो धावून आला. ज्या वधूला भाऊ नसेल तिचे हाल कुत्र्यानेही खाल्ले नसतील. सबब अभ्रातृक मुलीची किंमत विवाहकर्मात अत्यंत निकृष्ट किंवा शून्य मानलेली आहे व तसला पाठिंबा नसलेली मुलगी वधू करू नये असा निषेध केला आहे. शिळेवर वधू घट्ट उभी राहिली. नंतर देवांना द्यावयाचे धान्य भावाने आणिले आणि ते वधूच्या हाताने देवास अर्पण करविले. वध्वंजलौ उपस्तीर्य भ्राता भ्रातृस्थानो वा द्विर्लाजान आवपति १-७-८. वधूच्या ओंजळीला तूप लावून तिच्या भावाने किंवा भावासारख्याने त्या अंजलीत दोन वेळा लाह्या घातल्या. ( पंचप्रवरी असेल तर तीन वेळ लाह्या घालाव्या १-७-९ ). नंतर लाह्यांच्या अवदानावर तूप घातले १-७-१०/११. ते अवदान अग्निद्वारे अर्यमन, वरूण व पूषन या देवांच्या पदरात टाकले, आणि अवदान देताना देवांना खालीलप्रमाणे बजावले. अर्यमणं नु देवं कन्या अग्निं अयक्षत, स इमा देवो अर्यमा प्र इतः मुंचातु न अमृतः स्वाहा १-७-१३. अग्नीच्या द्वारा कन्या अर्यमन देवाला हे अवदान देत आहे, सबब येथून नव-यापासून अर्यमन देवाने हिला सोडवून नेऊ नये, तेथून आपल्या ताब्यातून सोडून द्यावा, हिच बजवणूक पूषन व वरूण या देवांची भावाने केली. भाऊ साधाभोळा नव्हता, हडसून खडसून व्यवहार करणारा होता. त्याने एकदम सा-या लाह्या किंवा सर्व अवदान तिन्ही देवांपुढे एकदम ओतले नाही. प्रत्येक देवाला एकेकटा बोलावून ज्याचे अवदान त्याच्या पदरात अग्नीला साक्ष ठेवून घातले. ओप्य ओप्य ह एके लाजान परिणयंति तथा उत्तमे आहुती न

सन्निपतत:१-७-१५. एकदम सारी अवदाने देण्यात गडबड व गोंधळ होतो, कोणाचे कोनते अवदान ते समजत नाही, सबब प्रत्येक अवदानानंतर अग्नीला प्रदक्षिणा घालून भावाने प्रत्येक देवाच्या माथी त्याचे त्याचे अवदान बिनचूक मारले. भावाच्या सहाय्याने वधूची देवांच्या देण्यातून यद्यपि सुटका झाली, तथापि अद्याप वधूच्या केसांना वरूणाने जखडून बांधलेला लोकरीचा दोर उर्फ पाश वधूला पीडा करीतच होता. त्या पाशातून गरीब बिचा-या वधूचे केश वराने हलकेहलके  सोडविले व खालील धन्योदगार काढिले.

प्र त्वा मुंचामि वरूणस्य पाशात १-७-१७।१८

प्रिये, तुला वरूणाच्या पाशांतून कायमची मुक्त केली आहे. हे आश्वासम दिल्यावर वराने मोठ्या तो-याने व विजयाने वधूला अपराजित दिशेने सात पावले चालविले. देवांच्या कचाट्यांतून  वधू सोडवीत आपण मोठा जय मिळवला हे जाहीर करण्याच्या  हेतूने वराने वधूला ईशान्य दिशेकडे नेले, कारण ईशान्य दिशा ही आर्षलोकांना जय मिळाल्याची दिशा होती व ऐतदर्थ त्यांनी या दिशेचे नाव अपराजित असे ठेविले होते. स्त्रियांना अग्रोपभोगाकरिता देवांच्या स्वाधीन करण्याची ही पुरातन आर्ष चाल अवशेषरूपाने सध्या आपणात प्रचलित आहे व ती प्रतीकरूपाने प्रचलित आहे. पुरातन आर्ष लोकांत ही चाल साक्षात प्रचलित होती. सबब श्रेष्ठांना, समर्थांना व आपल्याहून बलिष्ठांना स्त्रिया अर्पण करणा-या रानटी टास्मेनियन लोकांच्या पंगतीस पुरातन आर्ष लोकांना बसविण्यास हे एक तिसरे कारण उपलब्ध झाले.

(७) पाशव अवस्थेतून परिणत होत होत मनुष्य जमाव करून राहू लागला. या यूथावस्थेत नाना प्रकारचे संकीर्ण व्यवाय स्त्रीपुरूषांत होत. वडील धाकुटेपणाचे नाते अस्तित्वातच नसल्यामुळे, वयात आलेल्या कोणत्याही स्त्रीशी पुरूष सरमिसळ व्यवहार करीत. त्याच्याही पलीकडे जाऊन, यूथावस्थ समाजात वयात न आलेल्या कन्यांशीही व्यवहार झाल्याची उदाहरणे भारतात व हरिवंशात आढळतात. आदिपर्वाच्या ११२ व्या अध्यायात कुंतीचे व पंडूचे संभाषण दिले आहे. त्यात प्राचीनकालीन म्हणजे आपल्याहून फार प्राचीनकालीन स्त्रीधर्माचे निरूपण करताना पंडु म्हणतो, अतिप्राचीन काळी कन्या कौमारावस्थेपासून पतिमर्यादेचा अतिक्रम करईत व तो अतिक्रम अधर्म समजला जात नसे, म्हणजे तत्कालीन समाजाला संमत असे. कुंतीला कोणत्याही प्रकारची शंका राहू नये म्हणून पंडु पुढे असे ठासून सांगतो की, हे धर्मतत्व सनातन असून स्त्रियांत सुखप्रद असल्यामुळे उत्तर करू देशात हा व्यवहार सांप्रत चालू आहे. उत्तरकरू ही पांडवांची मूळभूमी असल्यामुळे तिच्यावर त्यांचे विशेष प्रेम असे व तीतील आचार ते शिष्ट मानीत असत, हे येथे लक्षात बाळगिले पाहिजे. हाच प्राचीन सनातन धर्म बालपणी कुंतीला सूर्यनारायणाने सांगितला होता. वनपर्वाच्या ३०७ व्या अध्यायात सूर्य म्हणतो, हे कुंती ! कन्या शब्दाची उत्पत्ती कम धातूपासून झालेली असून त्याचा अर्थ हव्या त्या पुरूषाची इच्छा करू शकणारी असा आहे. कन्या स्वतंत्र आहे, स्त्रिया व पुरूष यांच्यामध्ये कोणत्याही प्रकारचा आडपडदा नसणे हीच लोकांची स्वाभाविक स्थिती असून, विवाहादिक संस्कार सर्व कृत्रिम आहेत, यास्तव तू माझ्याशी समागम कर, समागम केल्यावरही तू पुनरपि कुमारीच म्हणजे अक्षतयोनीच राहशील. कुंतीला हा काळपर्यंत रजोदर्शन झाले नव्हते, म्हणजे ती केवळ बाला होती. अरजस्क स्त्रीशी समागम केल्याचा दोष भगवान सूर्यनारायणाला लागेल या भीतीने कवीने म्हणजे व्यासांनी येथे वर्णन करण्यात अशी शिताफी केली आहे की कुंतीला ह्याच वेळी पहिले विटासपण आले म्हणून आगाऊच त्यांनी मेख मारून ठेवली. कवीची ही कारूणिक बुद्धि एकीकडे   ठेवून पाहता असे दिसते की कुंती या वेळी अक्षतयोनि व अरजस्क  मुलगी होती, कदाचित तिचा उमेदवार होण्याचा समय जवळ आलेला असावा. कुंतीच्याप्रमाणेच पराशर ऋषीने उपभोगिलेली मत्सगंधा कुमारीच होती व उपभोगानंतर कुमारीच राहिली म्हणून कवी सांगतो. गंगानामक कुमारीशी शंतनु राजाने समागम केल्याचे वृत्त सर्वप्रसिद्ध आहे. तात्पर्य, ज्याला आपण कन्यादूषण म्हणून म्हणतो ते प्राचीन आर्यलोकात सनातन धर्म म्हणून होते, व त्याचा प्रघात कौरवपांडवांच्या काळीही होता. हा प्रघात पाणिनीच्या काळीही तुरळक होता. कुमार: श्रमणादिभि:

२-१-७०, या सूत्रात कुमारकुलटा, कुमारगर्भिणी व कुमारबंधकी हे तीन सत्पुरूष समास पाणिनी देतो. श्रमणादिगतात कुलटा हा शब्द तिसरा आहे. कुमारकुलटा म्हणजे कुमारी चासौ कुलटा च. कुमारी असून जी कुलटा म्हणजे छिनाल ती कुमारकुलटा. कोंवारपणी जी गर्भार राहिली ती कुमारगर्भिणी व कोंवारपणी जी वांडकी निघाली ती कुमारबंधकी . याचा अर्थ असा की पाणिनीकाली कुमारी व्यभिचारिणी वांडक्या व गर्भार असलेल्या आढळत असत. कौमारापूर्वचने ४-२-१३ या सूत्रात कौमार: पति: व कौमारी भार्या असे दोन प्रयोग पाणिनी देतो. पुंसा सह यस्या: असंप्रयोग: सा कुमारी ६-२-९५ असा कुमारी शब्दाचा सांप्रदायिक अर्थ आहे. जिला पूर्वी पुरूष माहीत नाही अशा मुलीच्या नव-याला पाणिनीकाली कौमार: पति: म्हणून म्हणत व त्या मुलीला विवाहानंतर कौमारी भार्या म्हणत. ह्यापासून गर्भित अर्थ असा निघतो की पाणिनीकाली ज्याप्रमाणे विवाहापूर्वी पुरूष माहीत नसलेल्या मुली असत त्याचप्रमाणे पुरुष माहीत असलेल्याही मुली आढळत. नाहीतर कौमार: पति: व कौमारी भार्या यांचे विशेष कौतुक पाणिनीकाली झाले नसते. ह्या सर्व विवेचनाचा मतितार्थ असा की, अतिप्राचीन आर्ष काळापासून पाणिनीकालापर्यंत अविवाहित मुलीशी समागम करण्याची रूढी भारतीय समाजात प्रथम अनिंद्य व धर्म्य म्हणून व पुढे पुढे निंद्य म्हणून प्रचलित होती. मागे चौथ्या कलमात सांगितलेच आहे की अतिप्राचीन आर्ष काळी मुलींवर सहा वर्षांपर्यंत देवांचा हक्क असे. नंतर त्यांच्यावर मनुष्यांचा हक्क उत्पन्न होई. याचकरिता आठव्या वर्षी मुलीचा विवाह करावा अशी रूढी भारतीय समाजात असलेली दिसते. आठ वर्षांपासून मुली पुरूषाला उपभोग्य होत असा सामाजिक अभिप्राय होता. चोविस वर्षांच्या मुलाने आठ वर्षांच्या मुलीशी विवाह करावा, अशा अर्थाच्या स्मृति प्रसिद्ध आहेत. विवाहरात्रौ समागम करावा अशीही स्मृतिवचने आहेत. तेव्हा, आठ वर्षांच्या मुली समागमेय समजण्याची रूढी देशात होती यात संशय नाही. पुरूषसमागम आधी यद्यपि झाला व त्या समागमापासून अपत्यही यद्यपि झाले, तत्रापि पुढे धर्म्य विवाह होण्याला मुलींना कोणतीच आडकाठी नसे. अशी ही कन्यादूषणाची चाल आर्ष समाजात होती. पृथ्वीवरील इतर त्याच योग्यतेच्या समाजात ही चाल आढळून येते. At Noukatriva, the young girls of the island are the wives of all those who can buy their favors, When they are older, they form more lasting connections. In the same archipelago the French sailors were frequently offered girls of eight years and they were not virgins ( Letourneau )

नुकाट्रिवांत तेथील तरूण मुलीजे कोणी त्यांना आकर्षित करून घेऊ शकत त्या सर्वांच्या पत्नी असत. जेव्हा त्या जरा मोठ्या होत तेव्हा त्या स्थिर संबंध प्रस्थापित करीत. द्विपसमूहात पुष्कळदा फ्रेंच नाविकांना आठ वर्षे वयाच्या मुली दिल्या आणि त्या कुमारी नसत [ लिटोर्न्यू ]

ह्या तुलनेवरून दिसेल की अतिप्राचीन आर्षसमाज एके काळी अत्यंत रानटी अशा यूथावस्थेत होता, कन्यादूषनाच्या संबंधाने युवन व युवती हे दोन जुनाट शब्द लक्ष्य आहेत. यु म्हणजे जुडणे आणि युवन म्हणजे जुडणारा, समागम करणारा. युवती म्हणजे समागम करणारी. संघातील मुलगे व मुली ही समागम करण्यास योग्य झाली म्हणजे आर्षलोक त्यांना संभोग करू देत. ऑस्ट्रेलियांत ही चाल दृष्टीस पडते. हीच स्थिती प्राचीन आर्षसमाजात होती. In Australia, the girls cohabit from the age of ten with young boys of fourteen or fifteen, without rebuke from anyone ( Letourneau ) ऑस्ट्रेलियांत दहा वर्षांच्या मुली चौदा आणि पंधरा वर्षाच्या मुलांबरोबर संभोग करीत आणि त्याबद्दल त्यांना कोणी दोष देत नसे. हीच स्थिती प्राचीन आर्षसमाजात होती.

(८) यूठावस्थेत आर्षसमाज असताना, स्त्रीपुरूषसमागम अत्यंत अनियमित असे, म्हनजे नातेगोते काहीएक बघत नसत; कारण नातेगोते उत्पन्नच झालेले नव्हते. कुमारींशी समागम करीत, उघड्यांत पशूंप्रमाणे समागम करीत इत्यादी स्वैरपणा यद्यपि होता. तत्रापि तशाही स्थितीत स्त्रियांना पुरूष आपली मालमत्ता समजत ही बाबा सदैव लक्षांत ठेविली पाहिजे. पाणिनीय समाहारद्वंदाची जी उदाहरने दिली आहेत. त्यात दारगवम हे एक उदाहरण दिलेले सर्वप्रसिद्ध आहे. दारा: च गाव: च दारगवम. दारा: म्हणजे स्त्रिया. यांची गणना गाईच्याबरोबर केलेली आहे. ही स्थिती पाणिनीच्या वेळची. प्राचीन आर्षांच्या काळी तर ही स्थिती ह्याह्ून प्रखर होती. स्मृतिकार व सूत्रकार जे आठ विवाह सांगतात, त्यांत आर्षविवाहाचे वर्णन येते. या विवाहात वर किंवा वराचा बांप वधूच्या बापाला गोमिथुन म्हणजे

एक गाय व एक बैल देऊन कन्या घेतो म्हणजे अर्थात विकत घेतो. ह्या विवाहाला आर्षविवाह ही संज्ञा आहे. ह्यावरून उघड होते की, आर्षलोकांत मुलीची किंमत एक गाय व एक बैल समजत असत. अर्थात नित्याच्या बोलण्यात आपल्या मालमत्तेचे वर्णन करावयाचे असल्यास ते दारागवम या सामासिक शब्दाने आर्षलोक करीत. असुर साक्षात धन घेऊन कन्याविक्रय करीत. आर्षलोक गोमिथुन घेऊन कन्याविक्रय करीत, कारण इतर सुवर्णादि धन अत्यंत प्राचीन काळी आर्षलोकांना मुळी माहीतच नव्हते. आर्षलोक जसा कन्याविक्रय करीत तसाच ते आपल्या इतर स्त्रियांचाही विक्रय करीत. हरिवंशात ७९ व्या अध्यायात पुण्यक व्रताची कहाणी सांगितली आहे. तीत असे वर्णन आहे की, पुण्यकव्रत करणा-या पतिव्रता स्त्रीने ब्राह्मणांकडून त्यांच्या स्त्रिया विकत घ्याव्या व त्या आचार्यास उदकपूर्वक दान द्याव्या. In Ploynesia, the husbands trafficked in their wives without scruple. [ पॉलेनीशियात नवरे स्वस्त्रियांची विक्री करीत आणि त्याचे त्यांना काही वाटत नसे ]. हीच चाल प्राचीन आर्षसमाजात होती. जेथे स्वस्त्रिया व कन्या विकीत असत, तेथे त्या भाड्यानेही दिल्या जात असल्यास त्यात काही नवल नाही. उद्योगपर्वाच्या १०६ व्या अध्यायापासून १२३ व्या अध्यायापर्यंत माधवीचे आख्यान वर्णिले आहे. गालव नावाच्या ऋषीला ययातिराजाने आपली मुलगी माधवी गालवाला गुरूदक्षिणा द्ता यावी म्हणून दिली. ऋषीने तिला स्वत:ची मुलगी म्हणून तीन राजांना एकेक पुत्र होईतोपर्यंत क्रमाक्रमाने भाड्याने दिली, आणि नंतर ती मुलगी गालवाने आपला गुरू जो विश्वामित्र त्याला भार्या म्हणून अर्पण केली. तिच्यापासून विश्वामित्राला एक पुत्र झाल्यावर, गालवाने तिला तिचा बाप जो ययाति त्याच्या स्वाधीन परत केली. ह्या कथेत तीन आर्ष चालींचा निर्देश झाला आहे. (१) बाप आपल्या मुलीला वित्त म्हणून वाटेल त्यास काही काल भाड्याने देऊ शके. (२) शरीरसंबंध काही विवक्षित काल करण्याच्या अटीवर मुली गहाण टाकता येत असत. (३) आणि पुत्ररूप जो शिष्य त्याची मुलगी म्हणजे आपली नात पितृरूप जो गुरू तो काही काल बायको करू शके. आर्षलोक मुली किंवा स्त्रिया विकत किंवा भाड्याने देत असत हा प्रस्तुतचा मुद्दा आहे आणि ह्या प्रकरणी इतर रानटी लोकांप्रमाणेच पुरातन आर्षलोकांचा आचार असे हे सांगण्याकडे कटाक्ष आहे. ह्या चालीचा स्मारक असा वर्तमानकाली अवशेष म्हटला म्हणजे मराठी भाड्या हा शब्द आहे. भाड्या या शब्दाचे संस्कृत रूप भाटिक: स्वस्त्रीला भाड्याने देऊन त्यावर निर्वाह करणा-याला भाटिक म्हणून पूर्वी म्हणत असत व भाड्या म्हणून सध्या महाराष्ट्रात म्हणतात.

(९) पाशवदशेतून यूथावस्थेत येत असताना पाशवीवृत्तीचे अवशेष वन्य समाजात अनेक ठिकाणी आढळतात. In the sandwich Islands adultery, incest and formication were common things. ( सँडविच बेटात व्यभिचार, जवळच्या नात्यात संबंध आणि निषिद्ध संभोग या सामान्य गोष्टी होत्या). ज्याला सुधारलेला समाज आपल्या नातगोताच्या दृष्टीने Adultery incest व formication म्हणतो त्याची प्राचीन आर्ष समाजातील उदाहरणे वर हवी तितकी दिली. आता निराळयाच एका नीतिभ्रष्टतेची उदाहरणे महाभारतातून देतो. वनपर्वाच्या ११० व्या अध्यायात असे लिहिले आहे की ऋष्यशृंगपिता जो विभांडक ऋषि त्याला मृगीपासून ऋष्यशृंग पुत्र झाला. येथे मृग या शब्दाचा एक अर्थ अनृषि मनुष्यांची एक जात असा होईल. सर्प, नाग, गरूड, वानर ह्या जशा अनृषि मनुष्यांच्या जाती तशीच त्या काली मृग ही एक जात असावी. दुसरा मृग शब्दाचा अर्थ हरीणनामक पशू. पशूपासून ऋष्यशृंगासारखी मानवी प्रजा निष्पन्न होणे अशक्य असल्यामुळे हा दुसरा अर्थ प्रस्तुत उदाहरणात सोडून देणे बरे. आदिपर्वाच्या प्रथमाध्यायात व ११८ व्या अध्यायात पांडुशापवृत्त दिले आहे. त्यात दम ऋषि मृगीशी संग करीत असता पांडुराजाच्या बाणाने विद्ध होऊन मरण पावल्याचे लिहिले आहे. पांडुराजा मृगया करावयास गेला होता व तेथे हरणे मारीत होता. त्यात दम ऋषि एका हरीणीशी रममाण होण्यात गुंतला होता. ते ध्यानात न येऊन पांडूने बाण मारिला व तो दम ऋषीला लागला तेव्हा दम ऋषीने पांडूला हे पापकृत्य केल्याबद्दल दोष देऊन मैथुनकर्मात निमग्न झालेल्या आपणांस प्राणांतिक जखम केल्याबद्दलही दोष दिला. पशूशी मैथुन करण्यात काही विपरीतपणा आहे हे राजाच्या किंवा ऋषीच्या मनातसुद्धा आले नाही. कवीने म्हणजे व्यासांनी दम ऋषीच्या ह्या कृत्यावर असे पांघरूण घातले आहे की

दम ऋषीने हरीणीशी संग करण्याच्या वेळी हरणाचे रूप घेतले होते. व ती हरणीही दम ऋषीची बायको होती; परंतु ही मखलाशी  काढून टाकली म्हणजे खरा प्रकार उघडकीस येतो. आदि पर्वाच्या ६६ व्या अध्यायात वर्णन आहे की अश्वरूप धारण करणारी त्वाष्ट्री ही सूर्याची भार्या होती. म्हणजे घोडीशी पुरूष कर्म करीत असत अशी कल्पना तरी निदान व्यासकाली सर्वत्र वाचल्या जाणा-या ग्रंथात लिहिलेली खपत असे. ह्याहून नि:संदिग्ध असे पशुसंगाचे आर्ष उदाहरण म्हटले म्हणजे अश्वमेधयज्ञातील घोड्यांशी यजमान पत्नीने निजण्याचे. अश्वमेधांतील हे प्रतिकरूप कर्म आर्षलोकांच्या पाशवीवृत्तीतील  एका चालीचा अवशेष आहे हे जाणत्यांना सांगावयाला नकोच. अतिप्राचीन आर्षलोकांत स्त्रिया व पुरूष पशूंशी संग करीत व दिवसाढवळ्या सर्वांसमक्ष करीत व त्यांत काही विपरीतपणा त्यांना भासत नसे. या बाबीच्या सिद्धयर्थ ह्याहून जास्त पुरावा नको. सांप्रतकाली कुत्र्यांशी, गाढवीशी, शेळयांशी व गाईशी संग केल्यचे वृत्त कर्णोपकर्णी महाराष्ट्रात कधी कोठे ऐकू येते. परंतु समाजात व कायद्यात तो अक्षम्य अपराध म्हणून गणिला जातो. प्राचीन आर्षाकाली तो अक्षम्य अपराध व गुन्हा समजला जात नसे, एवढाच प्राचीन व अर्वाचीन समाजात भेद.

(१०) असल्या ह्या सरमिसळ व्यवाय करणा-या अतिप्राचीन आर्षसमाजात आपल्या ह्या वर्तमानकालीन समाजातील आई, भाऊ, चुलता, मामा, आत्या इत्यादी बहुविध नाती व भेद असण्याचा संभवच नाही. तत्रापि बहुविध नाती व भेद यद्यपि नसले तरी काही थोडे भेद व नाती ह्या रानटी समाजात उदभवल्याशिवाय राहिली नाहीत. जमावातील किंवा यूथातील सर्व बाया सर्व मुलांच्या आया पडल्याकारणाने, त्या काली स्त्रीसामान्याला जनि  ही संज्ञा असे. जनि म्हणजे जन्म देणारी जन्‌+इ. इ. म्हणजे ती व जन्‌ म्हणजे जन्म देणे, जनि म्हनजे ती जन्म देते. जमावातील सर्व स्त्रिया जशा जनि या शब्दाने निर्देशिल्या जात त्याचप्रमाणे ह्या जन्मापासून झालेल्या सर्व व्यक्तींना जन ही संज्ञा असे. जन या शब्दांत स्त्री-पुरूष, लहानमोठे असे जमावातील सर्व माणूस सामान्यत: येई व विशेषत: जन्यांपासूनन झालेली  पुल्लिंगी प्रजा येई. सर्व पुरूष सर्व स्रियांशी सरमिसळ व्यवाय करीत असल्यामुळे, सर्व जन सर्व जन्यांचे नवरे व सर्व जन्या सर्व जनांच्या नव-या असत. म्हनजे स्त्री आणि पुरूष असे दोनच भेद यूथावस्थेतील अतिप्राचीन आर्षसमाजात असत. त्या काली स्त्री व पुरूष हे शब्दही बहुश: घडण्यात आले नव्हते. इतकेच काय तर ऋषी हा शब्दसुद्धा घडण्यात आला नसावा. अर्थात त्या अतिप्राचीन सरमिसळ व्यवाय करणा-या यूथावस्थ समाजाला आर्षसमाज म्हणणेही ऐतिहासिक म्हणजे पौर्वापर्य दृष्टीने अयुक्त होय. तथापि ऋषीचे ते पूर्वज होते एवढ्याचकरिता त्या यूथाला आर्ष ही संज्ञा लाविली आहे. त्या काली फक्त जन व जनि, जन्म दिलेले व जन्म देणा-या हे शब्द निर्माण झाले होते. स्त्री, पुरूष, बंधु, भगिनी, पिता, पुत्र, माता, दुहिता, स्वसृ, यातृ इत्यादी शब्द, भेद व नाती कशी व केव्हा निर्माण झाली व उदयास आली या बोधप्रद विषयाचा ऊहापोह पुढे याथाप्रसंग करावयाचा आहे.

***********

प्रकरण २ रे

# स्त्रियांचे वंशप्रवर्तक व प्रजापतिसंस्था

१. अतिप्राचीन आर्ष समाजात म्हणजे यूथावस्थ आर्ष समाजात, म्हणजे पाशवावस्थेतून नुकत्याच बाहेर पडलेल्या आर्ष समाजात, स्त्रीपुरूषसमागम अत्यंत अनियमित असे, अथवा त्याला कोणताच निर्बंध नसे; म्हणजे आई, बाप, भाऊ, बहिण ही नात्यांची नावे ज्यांना कालांतराने पुढे पडली त्यांच्यात समागम सररहा होत असे हे महाभारतातील कित्येक पुराण इतिहासकथांवरून आपणांस ताडिता आले. या प्राचीन इतिहासकथांचा मूळ व एकच एक उगम वेद आहेत असे जरि म्हणता येत नाही, तरी एवढे प्रमाणबद्ध विधान बिनधोक करता येते की महाभारतात ज्या पुराणकथा सांगितल्या आहेत, त्यातील ब-याच व्यक्तींचा उल्लेख वेदातून आलेला आढळतो. हे इंद्रा, तू अमक्या अमक्या प्राचीन किंवा नुकत्याच होऊन गेलेल्या ऋषीला किंवा राजाला जसे अमुक अमुक त-हेने तारिलेस व रक्षिलेस तसे मला किंवा माझ्या कुळाला तार, अशी प्रार्थना जेथे जेथे येते तेथे तेथे त्या ऋषीला किंवा राजाला कोणत्या संकटात इंद्राने किंवा अग्नीने किंवा ऋभूंनी तारिले त्याचा ओझरता, त्रोटक व फारच झाला तर संक्षिप्त उल्लेख केलेला बहुश: सापडतो. हे उल्लेख ज्या हकीकतीसंबंधाने केलेले आहेत त्या हकीकती ऋचा व सूक्ते ज्या ऋषींनी रचिली त्यांना तर संपूर्ण माहीत असतील यात जसा संशय नाही, तसाच त्या ऋचा व सूक्ते ऐकणा-या समाजालाही तितक्याच संपूर्णतेने अवगत असल्यावाचून कवीचे व श्रोत्यांचे एकावधान शक्य नाही. तात्पर्य, ऋचा ज्या काली ऋषींनी रचिल्या त्या काली आर्ष समाजात ह्या पुरातन कथा प्राय: तोंडी दंतकथा भारतात त्या त्या स्थळी व्यासांनी भीष्मादिकांच्या तोंडून पुराण इतिहास म्हणून वदविल्या आहेत. मूळच्या वैदिक दंतकथा म्हणजे तोंडी हकीकती व्यासांनी जशा त्या मुळात घडल्या तशाच बहुतेक दिल्या आहेत. त्यास त्यांनी स्वत:च्या पदरांचा जोड जो दिलेला आहे तो एवढाच की स्वत:च्या कालच्या समजुतीच्या व नितिमत्तेच्या दृष्टया त्या विगर्हणीय भासू नयेत म्हणून बहुतेक प्रत्येक हकीकतीला दैवी व अद्भूत कारणांची पुष्टी दिली आहे. उदाहरणार्थ, दम ऋषीने मृगीशी संग केला ही मूळची आर्षकालीन हकीकत. ही कथा स्वकालीन समाजाला निंद्य, गर्ह्य, लाजिरवाणी व अधर्म्य वाटेल व प्राचीन पूर्वजांची निंदा केल्याचे पातक माथ्यावर पडेल या भीतीने व्यासांनी एवढीच मखलाशी केली की दम ऋषीला व त्याच्या स्त्रीला वाटेल त्या प्राण्याचे रुप धारण करण्याचे तपोबलाने सामर्थ्य असल्यामुळे, ती दोघे मृगाचे रूप घेऊन क्रीडा करीत होती, सबब हा समागम नीतीला व धर्माला सोडून नव्हता. दुसरे उदाहरण अत्यंत प्रसिद्ध असे कुंतीचे घेऊ. कुंतीने तीन परपुरूषांपासून म्हणजे स्वपतीव्यतिरिक्त अन्य पुरूषांपासून संतती करून घेतली ही मूळ हकीकत. ही उघडीनागडी हकीकत व्यासकालीन- म्हणजे शकपूर्व चार-पाचशे वर्षांपलीकडे झालेल्या महाभारतकालीन-नीतीला व धर्माला किंचित् गौण व कमीपणा आणणारी भासल्यामुळे व्यासांनी एवढीच दैवी व अद्भुत मखलाशी केली की, कुंतीशी ज्या परपुरूषांनी समागम केला ते पुरूष भिकार व पापी मानव नव्हेत तर इंद्र, यम , वरूण इत्यादी सारखे मोठे मोठे देव होते. ही मखलाशी पहिल्या प्रथम महाभारतकार व्यासांनीच निर्माण केली असेल असेही म्हणवत नाही. पिढयान् पिढया ही दंतकथा सांगणारांनी देखील उघडयानागडया अश्लीलत्वांवर झाकण घालण्याच्या सद्बुद्धीने ही मखलाशी केली असण्याचा पूर्ण संभव आहे. कारण, पितरांची व त्याचबरोबर आपलीही निंदा करण्याची खंत मनुष्यमात्राच्या प्रगतिप्रवण नीतिमत्तेला वाटलेली सर्वत्र आढळून येते. यांचे अत्यंत ठळक असे सेमेटिक उदाहरण म्हणजे ख्रिस्ती धर्मोत्पादक ख्रिस्ताचे. ह्याची आई जी मेरी तिला साक्षात होली घोस्टकरवी गर्भदान झाले, अशी दंतकथा आहे. मर्त्य पुरूषाच्या समागमाव्यतिरिक्त मर्त्य स्त्रीला प्रजा होणे असंभाव्य आहे या दृष्टीने पाहता कुमारी मेरी हिला कोण्यातरी पुरूषापासून ख्रिस्त झाला असला पाहिजे. परंतु असले बिगरलग्न प्रजोत्पादन त्या काली यहुदी लोकांत नीतिबाह्य दिसत असल्यामुळे दैवी गर्भादानाची मखलाशी नवीन निर्माण करणे अवश्य झालेले उघड उघड दिसत आहे. पुरूषाशिवाय गर्भधारणेवर ( Immaculate conception ) कितीतरी पांडित्य ख्रिस्ती पंडितांनी केलेले जे आढळते त्यातील बीज इतकेच की, साधुवर्य ख्रिस्ताचा जन्म अधर्म्य व नीतिबाह्य नाही हे कसेतरी श्रोत्यांना पटवून द्यावे. युरोपियन पुरूषांशिवाय गर्भधारणावाल्यांची जी दुर्दशा तीच महाभारतकार व्यासांचीही दुर्दशा आहे. तात्पर्य, महाभारतातील विस्तृत प्राचीन इतिहासकथांना वैदिक त्रोटक उल्लेखांचा आधार आहे. असो, प्राचीन आर्य समाजात सरमिसळ स्त्री-पुरूषसमागम एका काळी

प्रचलित होता, ऐतत्संबंधाने सध्या आपण विवेचन करीत आहोत व ते विवेचन मुख्यत: ऋग्वेदात सरमिसळ स्त्री-पुरूषसमागमसंबाधाने बरेच उल्लेख स्थळोस्थळी आढळतात. त्यापैकी दोन तीन मासल्यांकरिता येथे देतो. यम आणि यमी या बहीण-भावंडासंबंधाने विशेष उल्लेख करावयाला नकोच, कारण ही वैदिक कथा बहुतेक आबालवृद्धांच्या कानावरून गेलेली आढळते. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलात व अथर्ववेदाच्या अठराव्या कांडात यम आणि यमी यांचा संवाद दिलेला आहे. यमी आपला सोदर भाऊ जो यम त्यापाशी संभोगाची याचना करू लागली. ती याचना यमाने फेटाळली. तो म्हणाला, वरूणाचे दूत आपले कृत्य पाहतील व दोष देतील.

महस्पुत्रासो असुरस्य वीरा । दिवो धर्तार उर्विया परि ख्यन ॥

त्यावर यमी म्हणाली, देव रागावणार तर नाहीतच, उलटे त्यांना आपले हे कृत्य पसंत पडेल.

उशंति घा ते अमृतास एतद् ।

यम व यमी यांच्या ह्या संवादावरून उघड होत आहे की, फार पुरातनकाळी बहीण-भावंडांचा समागम रानटी आर्य लोकांत प्रचलित होता, व ऋग्वेदकाळी तो गर्ह्य समजला जाऊ लागला होता. बहीण-भावंडांच्या समागमाचे उत्तम उदाहरण महाभारताच्या प्रारंभालाच दिलेले आढळते. अदिती ही दिक्षाची कन्या व तीच अदिती दक्षाची आई असे विधान दहाव्या अष्टकातील ७२ व्या अध्यायाच्या चौथ्या वर्गात केलेले आढळते. सरमिसळ समागमाचे हे नामी उदाहरण आहे. य इं चकार न सो अस्य वेद, स मातुर्योनौ परिवीत: । हे विधान पहिल्या मंडळाच्या २२ व्या अनुवाकाच्या १६४ च्या सूक्तातील ३२ व्या ऋचेत आले आहे. बापाला आपला मुलगा कोणता ते माहीत नाही, आईच्या पोटी तो उत्पन्न झाला एवढे मात्र खरे, असा या ऋचेचा गर्भितार्थ आहे हेही सरमिसळ समागमाचेच उदाहरण आहे. “ य० भ्राता पतिर्भूत्वा जारो भूत्वा विपत्यते, प्रचां यस्ते जिघांसति तमितो नाशयामसि ( १०-१६२-५)” या वाक्यात गर्भार स्त्रीशी भाऊ, धनी किंवा जार यापैकी कोणी समागम करील त्याचे परिपत्य करू म्हणून दहशत घातलेली आहे. हेही सरमिसळ समागमाचेच उदाहरण आहे. स्त्री गर्भार नसली तर भावाने, धन्याने किंवा जाराने तिशी समागम केला तरी चालेल असा ध्वनी या दहशतीतून निघतो. अशी आणिक किती तरी वाक्ये ऋग्वेदातून काढून दाखविता येतील. सध्या इतकीच देऊन प्रकृताचे अनुसरण करतो. तात्पर्य, महाभारत व ऋग्वेदात सरमिसळ समागमाचे दाखले आढळतात व त्यावरून बिनधोक असे विधान करता येते की, अतिप्राचीन आर्य समाजात एकेकाळी स्त्रीपुरूष समागम अत्यंत अनियंत्रित असे.

२. यूथावस्थ आर्य समाजात जो अनियंत्रित स्त्री-पुरूष समागम एकेकाळी प्रचलित असे त्याचे रूपांतर कालांतराने कसे कसे होत गेले हे शोधून काढण्याचा प्रांत येथून पुढे लागतो. स्त्री-पुरूष समागमाला नियंत्रण बिलकुल नाही अशा पाशव स्थितीतून अतिप्राचीन आर्य समाजाने कोणकोणती नियंत्रणे उर्फ नियमने कसकशा परंपरेने ज्ञानत: वा अज्ञानत: निर्माण केली या बाबीचा शोध केवळ कल्पनेने करण्याची आवश्यकता नसून भारत व हरिवंश यांतील संभवपर्वस्थ वंशकथांवरून बराच निश्चिततेने लाविता येण्याची साधने आहेत. आदिपर्वाच्या ६४ व्या अध्यायात व हरिवंशाच्या पहिल्या, दुस-या व तिस-या अध्यायात देव, दानव, गंधर्वाप्सरस, मानव व यक्षराक्षस यांच्या उत्पत्तीची जी माहिती व्यासांनी पुराणातून परंपरेने ऐकिलेली दिली आहे ती पाहता असे दिसून येते की, प्राचीन इतिहासकार व्यास यांना प्राचीन आर्यसमाजविषयक जे काही ज्ञान पूर्वपुराणावरून झालेले होते ते बरेच संकुचित व मर्यादित होते. प्राचीन आर्य समाजात प्रजापतिसंस्था निर्माण झाल्यापासून माहिती हा दंतकथाकार उर्फ इतिहासकार देतो. तत्पूर्वीची माहिती याला ज्ञानत: नाही. येथे प्रजापतिसंस्था समाजशास्त्रात कशाला म्हणतात ते सांगणे जरूर आहे. अनियंत्रित स्त्री-पुरूष समागमकाली प्रजा, राज्य, पिता, पुत्र, माता, भगिनी इत्यादी नाती अस्तित्वात नव्हती. अमुक अपत्य अमुक पुरूषाचे असे नक्की म्हणण्यास सोय नव्हती. फक्त अमुक मूल अमुक स्त्रीचे इतकेच म्हणता येण्याची शक्यता होती. ती ही शक्यता त्या काळी तत्कालीन अनियंत्रित समाजाने मर्यादित करून ठेवली होती. जेवढया म्हणून स्त्रिया एखाद्या जमावात किंवा कळपात किंवा यूथात असत, तेवढया सर्व स्त्रिया कळपात जन्मलेल्या सर्व बालकांच्या माता समजण्याची रूढी असे. कार्तिकेय हा सहा किंवा सात आयांचा मुलगा म्हणून वर्णिलेला आहे व प्रत्येक आईने त्याला एकेक अवयव दिला असे सांगितले आहे.

म्हणजे जमावांतील एक विविक्षित स्त्रीच्या पोटी यद्यपि एकादे मूल जन्मले, तत्रापि त्या मुलाचे एकेक अवयव जमावांतील सर्व स्त्रियांच्यापासून होऊन ते मूल सबंद झाले, अशी समजूत यूथावस्थ आर्षसमाजात होती. द्वैमातुर, षाण्मातुर, साप्तमातुर वगैरे शब्द व अर्थ ह्या प्राचीन समजुतीचे दर्शक आहेत. या यूथावस्थकाली कळपातील स्त्रियांना जनि म्हणजे पोरे विणा-या म्हणत, पुरूषांना जन म्हणजे पोरे उत्पादणारे म्हणत व मुलांना जात म्हणजे स्त्रिया व पुरूष यांजपासून झालेले म्हणत. हे तिन्ही शब्द याच अर्थाने ऋग्वेदांत वारंवार आलेले आहेत. अर्वाचीन संस्कृतात मूळ या अर्थी जात शब्द योजिलेला सर्वांच्या परिचयाचा आहेच. या यूथावस्थेकाली मुलांची नावे त्या त्या कळपाच्या नावावरून पडत. कळपावरून पडलेल्या या नावांना यूथनामे अशी संज्ञा आहे. यूथनामांनाच पुढे किंचित् फरकाने गोत्रनामे ही संज्ञा मिळाली. मूल कोठले असे विचारल्यास ते अमुक अमुक यूथातले उर्फ कळपातले असे सांगण्याचा रिवाज असे. समजा की, एखाद्या यूथाचे नाव कदंब असले तर त्यातील सर्व मुलांना कादंब हे यूथनाम मिळे. कादंब म्हणजे कदंबाचा. मराठीत चा प्रत्यय शब्दाच्या शेवटी लावून आपण व्यवहार करतो. प्राचीन काळी मूळ शब्दाच्या आद्य स्वराची वृद्धी करून म्हणजे आद्यस्वरापूर्वी आ हा आगम करून तोच अर्थ प्रदर्शित करीत. कळपांतील सर्व मुलांना यूथनाम एकच असे. त्यावरून मूल अमुक कळपातले एवढाच बोध होई. एक मूल दुस-या मुलापासून निवडून काढण्याला हे यूथनाम उपयोगी पडत नसे. सबब दुसरे एक नाव मुलाचे अन्यव्यक्तिव्यावर्तक ठेवीत. ते नाव बापाच्या म्हणजे पुरुषाच्या नावावरून ठेवीत नसत; कारण की, अमुक मुलाचा अमुकच बाप असा निश्चय सरमिसळ व्यवायामुळे करता येत नसे, परंतु अमुक मूल अमुक स्त्रीच्या पोटी जन्मले हे निश्चित असल्यामुळे आईवरून मुलाला अन्य व्यावर्तक नाव मिळे. जसे ममता या स्त्रीच्या मुलाला मामतेय, विनता या स्त्रीच्या मुलाला वैनतेय इत्यादी. संभवपर्वात व हरिवंशाच्या पहिल्या तीन अध्यायात प्रजापतीच्या संततीचे वर्णन व्यास करीत आहेत खरे, परंतु प्रजापतीच्या संततीची नावे जी व्यासांनी परंपरागत पुराणावरून दिली आहेत, ती सर्व आयांच्या नावावरून पडलेली नावे आहेत. आयांच्या म्हणजे प्रजापतींच्या स्त्रियांच्या नावावरून पडलेल्या ह्या नावांची एक यादीच देतो.

| मातृनाम | अपत्यनाम |
|---|---|
| अदिति | आदित्येया: आदित्य: |
| दिति | दैत्या: दैतेया: |
| कृत्तिका | कार्तिकेय: |
| दनु | दानव: |
| कद्रू | काद्रवेया: |
| विनता | वैनतेय: |
| काला | कालेया: |
| निरऋति | नैऋत्येया: |
| सिंहिका | सैहिकेया: |
| पुलोमन् | पौलोमा: |
| कालका | कालकेया: |
| वसु | वासव: वसव: |
| साध्या | साध्य |
| विश्वा | विश्व |
| मरूत्मती | मरूत्मंत: |
| भानु: | भानव: |
| मुहूर्ता | मुहूर्ता: |

यापैकी एकही अपत्यनाम प्रजापतींच्या नावांपासून झालेले नाही. एकोनएक नावे आयांच्या

नावावरून पडलेली आहेत. याचा अर्थ असा की, आर्यसमाजात प्रजापतिसंस्था स्थापन होण्यापूर्वी अपत्ये स्त्रियांच्या नावाने ओळखिली जात, म्हणजे प्रजापती निर्माण होण्याच्या पूर्वी वंशावतरण स्त्रियांच्या अधीन असे, पुरूषांच्या नसे म्हणजे स्त्रिया वंशप्रवर्तक असत, पुरूष नसत हे वंशप्रवर्तकत्व स्त्रियांना कसे मिळत गेले ते पाहणे मोठे मनोरंजक आहे.

आयांवरून मुलांना व्यावर्तक नाव ठेवण्याची आवश्यकता ज्या काली भासू लागली त्या काली मूळच्या सरमिसळ समाजात एक क्रांती घडून आली. सर्व मुले यूथातील सर्व स्त्रियाछ्नी सामायिक समजण्याची चाल मागे पडून अमुक मूल अमुक स्त्रीचे असे वैशिष्ट्यीकरण सुरू झाले, सामायिक मातृत्व जाऊन वैयक्तिक मातृत्व उदयास आले. मायिक यूथात उर्फ कळपात अपत्यांच्या माता ज्या स्त्रिया त्यांच्या करवी प्रथम अस्पष्ट विभाजन प्रचलित झाले. आई व तिची अपत्ये हे अस्पष्ट कुटुंब झाले. यूट्थातील प्रजननक्षम अशा सर्व स्त्रियांची अशी अस्पष्ट कुटुंबे झाली. अद्याप ही सर्व कुटुंबे पृथक् पृथक् विभक्त होऊन एकापासून दूर राहू लागली नव्हती. सर्व कुटुंबे यूथातच असत. स्त्रियांशी समागम यूथातील वाटेल तो पुरूष करीतच असे. पुढे स्त्रिया-स्त्रियांत आपापल्या अपत्यांच्या जोपासनेसंबंधाने व इतर अशा मायेच्या कारणांनी बेबनाव वाढून स्त्रिया आपापल्या मुलांबाळांसह स्वतंत्र झोपडी करून स्वतंत्र संसार थाटू लागल्या. तथापि यूथातील वाटेल त्या पुरूषांशी स्वतंत्र कुटुंबातील स्त्रियांचा संबंध चालूच असे. पुरूषांनी मृगया करावी. रानावनातून श्वापदे मारून आणावी व ती कुटुंबस्थापक स्त्रियांच्या हवाली करून स्त्रिया तयार करतील ते अन्न खाऊन खुशाल असावे असा मनू सुरू झाला. ह्या स्वतंत्र कुटुंबे स्थापन करणा-या स्त्रिया प्रथम प्रथम एकाच आईच्या पोटी जन्मलेल्या सोदर बहिणी बहिणी असत. सामायिक यूथसंस्था फोडून विभक्त कुटुंबसंस्था जी प्रथम उदयास आली ती यूथातील सोदर बहिणींच्या हस्ते उदयास आली या विधानाला पोषक असे प्रमाण भारत व हरिवंश यातील संभवपर्वात ठळक असे सापडते. दक्षाला ज्या साठ कन्या झाल्या ( हरिवंश अध्याय ३ ) त्यापैखि दहा कन्या त्याने धर्म ऋषीला दिल्या, तेरा कश्यपाला दिल्या, सत्तावीस सोमाला दिल्या, चार अरिष्टनेमीला दिल्या, आणि दोन दोन भृगु, अंगिरस आणि कृशाश्व यांना प्रत्येकी दिल्या. येथे असा प्रश्न उद्भवतो की, दक्षाने ज्या पुरूषांना आपल्या कन्या दिल्या, ते पुरूष एकंदर सात होते, तर त्या सातांना कन्यांचा सारखा विभाग करून कां दिला नाही ? कोणाला दोन दोन, कोणाला चार, कोणाला तेरा, कोणाला सत्तावीस असा विषम विभाग कां केला ? ह्या प्रश्नाला समर्पक व समाधानकारक असे सर्वात उत्तम उत्तर एकच संभवते, ते हे की यूथांतील सोदर बहिणी बहिणी ज्या मुली होत्या त्या सोदरत्वास्तव बद्ध मायेने झालेल्या असल्यामुळे त्यांचा संसार एकाच कुटुंबात झाला असता सर्वांच्या मनाजोगता होईल असा कयास करून दक्षाने ही विषम वाटणी केली. तात्पर्य, सांगावयाचा मुद्दा एवढाच की, यूथातून विभक्त होऊन स्वतंत्र कुटुंबस्थापना जी प्रथम झाली ती सोदर बहिणींच्या हस्ते झाली. यूथातील सर्व अपत्ये यूथातील सर्व स्त्रियांची समजण्याचा जो पूर्वीचा प्रघात होता, तोच प्रघात सोदर बहिणींच्या कुटंबात काही काळ चालू होता. याला पोषक प्रमाण कृत्तिकांचे कार्तिकेय जो षडानन तो ह्या सात कृत्तिका बहिणींचा सामायिक मुलगा म्हणून वर्णन केलेले आहे. हे सामायिकत्व पुढे कालांतराने नष्ट होऊन अपत्यांची मालकी त्या बहिणींची वैयक्तिक झाली. यूथवस्थ समाज असताना त्या समाजात बहुपतित्व व बहुपत्नीत्व असे दोन्ही प्रकार स्त्री-पुरूषसंबंधाचे असत. यूथातून सोदर बहिणी विभक्त झाल्यावर त्यांनी जे कुटुंब स्थापिले त्यांत सोदर भगिन्यात्मक बहुपत्नीत्व होते हे सांगावयाला नकोच. हे भगिन्यात्मक बहुपत्नीक कुटुंब मात्रात्मक बहुपतिकही होते; कारण यूथात एकाच समयी बहुपत्नीत्व व बहुपतित्व जसे विद्यमान असे, तसेच यूथातून विभक्त होणा-या सोदर बहिणींच्या स्वतंत्र कुटुंबातही बहुपत्नीकत्व व बहुपतिकत्व असे. यूथात ज्या चाली होत्या त्याच चाली सोदर बहिणींच्या स्वतंत्र कुटुंबात दृष्टीस पडल्यास नवल नाही. पुरातन चाली एकदम नाहीशा होत नाहीत, आस्ते आस्ते नाहीशा होतात, व बहुतकालपर्यंत व कधीकधी तर वर्तमानकाळपर्यंत आपले अवशेष अशांशाने मागे ठेवतात. इतकेच की, ह्या अशांशाने मागे राहिलेल्या चाली इतर चालींच्या दडपणाखाली गुदमरून गेलेल्या असतात.

३. सोदर भगिनीनी सोदर भ्रात्यांच्या समागमाने स्वतंत्र कुटुंबसंस्था स्थपिल्यावर त्याही संस्थेत पुढे फेरफर झाले. सा-याच बहिणींना सारेच भाऊ किंवा साऱ्याच भावांना साऱ्याच बहिणी सारख्याच आवडत असतील असे नाही. आवडनिवड रूपामुळे, स्वभावामुळे व कामसूपणामुळे व्हावयाला लागून, इतर भावांहून सर्वतोप्रकारे श्रेष्ठ अशा एखाद्या भावावर ब-याच बहिणींचे मन बसून, त्यांनी त्या एकाच्याच समागमात कुटुंबसंस्था चालविण्याचा संकेत केला. अशा स्थितीत स्वस्त्रीय बहुपत्नीक व

एकपतिक कुटुंबसंस्था निर्माण झाली. याची ठळक उदाहरणे म्हटली म्हणजे दक्षाच्या साठ कन्यांची. ह्या साठांपैकी काहींनी धर्माशी, काहींनी सोमाशी, काहींनी कश्यपाशी पत्नीभावाने राहण्याचे पत्करिले. अशा तऱ्हेने बहुपत्नीक व एकपतिक कुटुंब अस्तित्वात आले. पक्षी इतर बहिणीहून गुणांनी सर्वतोप्रकारे श्रेष्ठ अशा एखाद्या बहिणीवर बऱ्याच भावांचे मन जाऊन, त्या भावानी त्या एकाच अप्रतिम बहिणीच्या समागमात राहून कुटुंब चालविण्याचा इरादा केला. अशा स्थितीत एकपत्नीक व बहुपतिक कुटुंब ज्याला म्हणतात ते निर्माण झाले. याचे ठळक उदाहरण म्हटले म्हणजे हरिवंशाच्या दुस-या अध्यायात वर्णिलेले प्रचेतस बंधूंचे. ह्या दहा प्रचेतस भ्रात्यांनी मारिषा नामक वृक्ष-कन्येशी समागम केला व त्या समागमापासून दक्षप्रजापति जन्मास आला. ह्या दोन प्रकारच्या कुटुंब संस्था निर्माण व्हावयाला इतरही कारणे झालेली असतील. इतर जमावांशी लढाई करताना यूथातील बरेच पुरूष मरून गेल्यास, राहिलेल्या एखाद्याशीच पत्नीभावाने राहण्याचा प्रसंग येऊन एकपतिक व बहुपत्नीक कुटुंब बनण्याचा संभव आहे. तसेच लढायांत स्त्रिया इतर यूथांनी पाडाव केला गेल्यास राहिलेल्या एखादीशीच संसार करण्याचे कपाळी येऊन बहुपतिक व एकपत्नीक कुटुंब घडले जाण्याचा संभव आहे. असो. अशा तऱ्हेने प्राचीन आर्ष लोकांत दो प्रकारची कुटुंबे जन्मास आली. एकात अनेक बहिणी एका भावाला पती म्हणून राहू लागल्या व दुसऱ्यात अनेक भाऊ एका बहिणीला पत्नी म्हणून राहू लागले. पहिल्याला बहुपत्नीक अशी संज्ञा सोईखातर देऊ व दुसऱ्याला बहुपतिक अशी संज्ञा देऊ. पैकी दुस-या कुटुंबात मुलाचा बाप अमुकच अशी निश्चिती नसल्यामुळे मुलाला नाव आईवरून मिळे, आणि पहिल्या प्रकारच्या कुटुंबात पती एकच असल्यामुळे, मुलाच्या बापाचा निश्चय यद्यपि संशयित नसे, तत्रापि जुनी चाल म्हणून बराच कालपर्यंत आयांच्या नावावरून मुलांचे नामकरण होई. ह्या दुस-या प्रकारात मागे दिलेली आदितेय, वैनतेय, दैतेय इत्यादी नावे पडतात. अदिति, दिति, कद्रू इत्यादी यद्यपि कश्यप प्रजापतिच्या स्त्रिया होत्या, व मुलांच्या बापासंबंधाने यद्यपि कोणत्याही प्रकारची अनिश्चितता नव्हती. तत्रापि पुरातन रूढीला अनुसरून कश्यपबीजाने अदितीच्या पोटी झालेल्या प्रजेला आदितेय किंवा आदित्य असे नाव आईच्या नावावरून पडले, म्हणजे वंश माता जी अदिति तिच्या नावाने प्रख्यात झाला, बाप जो कश्यप त्याच्या नावाने झाला नाही. ह्याचा अर्थ असा की, माता जी अदि ति कुटुंबात प्रधान गणली गेली, पिता जो कश्यप त्याला पूर्ण गौणत्व दिले गेले. पित्याला गौणत्व का मिळाले त्याला सबळ कारण आहे. प्रजापतिसंस्था म्हणजे एकपतित्वाची संस्था आर्य लोकांत जी सुरू झाली ती येथून तेथून साऱ्या आर्य लोकांत एकदम सुरू झाली नाही. आर्य लोकांतील काही थोडया टोळ्यांमध्ये सुरू झाली. बाकीच्या बऱ्याच टोळ्यांत बहुपतित्वाची चाल जय्यत प्रचलित होती, व जुनी म्हणून पुराणप्रिय आर्यांनी ती बहुतकालपर्यंत सोडली नाही. आर्य लोकांत बहुजनसंमत अशी जी ही बहुपतिकत्वाची चाल तिच्या अमलात अपत्यनामे मातृनामावरून ठेवण्याखेरीज गत्यंतर नव्हते. त्यामुळे बहुजनसमाजात मातृनामोत्पन्न अपत्यनामांची संख्या इतकी बेसुमार अधिकतर होती की, त्यांच्या बहुसंख्यपुढे पितृनामोत्पन्न अपत्यनामांची डाळ शिजवायला बहुत प्रयास पडले असावेत.प्रयास किती पडले असतील त्याचा अंदाज करावयास काही प्रमाण देतो. अतिप्राचीन आर्यकाळ व कौरव-पांडवांचा काळ यामध्ये काळाचे बरेच अंतर आहे. तथापि आर्य लोकांतील कित्येक समाजात मातृनामोत्पन्न अपत्यनामांची रेलचेल असलेली भारतेतिहासावरून दृष्टीस येते. कौंतेय, पार्थ, राधेय, गांगेय, सौभद्र, माद्रेय, द्रौपदेय इत्यादी पांडव कुळातील व्यक्तींची नावे मातृनामोत्पन्न आहेत. कृष्णाला देवकीनंदन हे नाव वासुदेव या नावाचा अपरपर्याय म्हणून दिलेले वारंवार आढळते. प्रजापतिसंस्था निर्माण होऊन हजारो वर्षे लोटल्यावर झालेल्या पांडवांच्या काळची ही कथा; मग खुद्द प्रजापतिसंस्था म्हणजे एकपतित्वाची संस्था ज्या पुरातन काळी निर्माण झाली त्या काली मातृनामजन्म अपत्यनामे सर्वत्र प्रचलित असल्यास व त्यांच्या पुढे पितृनामजन्य अपत्यनामाचा टिकाव न लागल्यास नवल कसले ? पांडवकालानंतर उपनिषदादी ग्रंथात, गुरूपंरपरेचे ब्राह्मणाचे वंश दिलेले आहेत. त्यात मातृनामजन्य अनेक नामे नमूद करून ठेविली आहेत. ती सर्वांच्या परिचयाची असल्यामुळे, त्यांनी येथे जागा अडवीत नाही. त्यावरून एवढे मात्र स्पष्ट होते, की पांडवांच्या पुढील काळात स्त्रिया गोप्रवर्तक उर्फ अपत्यनामप्रवर्तक असत व त्या ब्राह्मणात असत. उपनिषत्कालानंतर पाणिनीचा काल आला, अपत्यार्थक प्रत्ययमीमांसा करताना पीलाया वा ( ४-१-११८ ) या सूत्राने पीलाया अपत्यं पैल:, पैलेय: या मातृनामजन्य अपत्यनामांचा विशिष्ट सूत्र देऊन पाणिनी उल्लेख करतो. व्यच: ( ४-१-१२१ ) या सूत्राने दत्ताया अपत्यं दात्तेय: असे अपत्यनाम सिद्ध होते. या दात्तेय नामक लौकिक गोत्रनामावरून म्हणजे अपत्यनामावरून कोकणस्थातील दाते हे आडनाव निघालेले आहे. पैल, पैलेय,

दात्तेय ह्या अपत्यनामावरून स्पष्ट होते की, पाणिनीकाली मातृनामावरून अपत्यनामे थोडी बहुत प्रचलित होत असत. पाणिनीय अपत्याधिकारात बहुतेक लौकिक गोत्रप्रवर्तकांची नावे पुरूषांची आहेत; परंतु त्यात पीला, दत्ता वगैरे स्त्रीनामे अपवादादाखल तरी सापडतात. म्हणजे पाणीनीकाली काही कुटुंबे बहुपतिक असावी व त्यात अर्थातच मातृनामावरून अपत्यनाम बनविण्याची चाल अगितकत्वास्तव प्रचलित असावी. पाणिनीनंतर शातवाहनांचा काल येतो. वासिष्ठीपुत्र, गौतमीपुत्र इत्यादी मातृनामजन्य अपत्यनामे शातवाहन राजकुलात प्रचलित असलेली सर्वांच्या ओळखीची आहेत. हि मातृनामजन्य अपत्यनामे गमतीखातर ठेविली असतील हे संभवत नाही. शातवाहनकुल आंध्रजातीय व आंध्र-भृत्य होते आणि आंध्र लोकात बहुपतिकत्वाची चाल एका काळी होती याविषयी वाद नाही. शातवाहनांच्या नंतर मातृनामावरून अपत्यनाम पडल्याचा ठळक असा उल्लेख म्हटला म्हणजे भवभूतीने केलेला जातुकर्णीपुत्राचा. जातुकर्णीपुत्र म्हणजे जातुकर्णी स्त्रीचा पुत्र. जातुकर्णीच्या नव-याच्या नावावरून जातुकर्णीच्या पोटी झालेल्या पुत्राचे नाव पडलेले नसून स्वत: खुद्द जातुकर्णीच्या नावावरून पडलेले आहे, ही बाब लक्ष्य आहे. असो. भवभूतीपर्यंत स्त्रिया क्वचित् अपत्यनामप्रवर्तक असत, एवढे यावरून निश्चित आहे. तात्पर्य, अतिप्राचीन आर्यकालीन मातृनामोत्पन्न अपत्यनामे ठेवण्याची चाल हजारो वर्षे या देशात प्रचलित होती, व ती निखालस निर्मूलित व्हावयास आपला हा सध्याचा काल लागला. ह्यावरून प्राचीन काली मातृप्राधान्य जाऊन कुटुंबात पितृप्राधान्य यावयास किती प्रयास पडले असतील व प्रजापतिसंस्था म्हनजे एकपतित्वाची संस्था प्रचलित व्हावयास किती अडचणी आल्या असतील त्याचा अंदाज होण्यासारखा आहे.

४. कुटुंबात मातृप्राधान्य जाऊन पितृप्राधान्य यावयाला यद्यपि पराकाष्ठेचे प्रयास पडले, तत्रापि आर्य लोकांत प्रजापतिकाली पितृप्राधान्याची जी एकदा स्थापना काही टोळ्यात झाली तिची उपयुक्तता समाजाच्या ध्यानात उत्तरोत्तर जास्त जास्त येऊन ती संस्था कालांतराने आर्य लोकांत प्रथम शिष्टमान्य, नंतर बहुजनमान्य आणि शेवटी धर्ममान्य होऊन बसली. अशा काळी-म्हणजे पितृप्राधान्य बहुतेक पूर्णपणे स्थापित झाल्याच्या काळी-महाभारतनामक इतिहासाचा कर्ता जो व्यास नामक कोणी पुरुष जो शकपूर्व चौथ्या पाचव्या शतकाच्या सुमारास होऊन गेला असावा, त्याला भारतीय इतिहास रचण्याची आवश्यकता जेव्हा भासली तेव्हा त्याच्यापुढे असा प्रश्न पहिल्या प्रथम येऊन उभा राहिला की, भारतीय इतिहासाचा प्रारंभ कोठून करावा ? अतिप्राचीन सरमिसळ समागमाच्या काळापासून करावा की मातृप्रधान कुटुंबसंस्थेच्या काळापासून करावा, की पितृप्रधान जी प्रजापतिसंस्था तिच्या काळापासून करावा ? प्रथमपक्षी म्हणजे सरमिसळ समागमाच्या काळापासून इतिहासाचा प्रारंभ करावा म्हटले तर कोण कोणाचा कोण हेच ओळखण्याची तत्कालीन समाजसंबंधाने अडचण पडू लागली. सबब तेथून इतिहासाचा प्रारंभ करणे अव्यवहार्य दिसले. द्वितीयपक्षी म्हणजे मातृप्रधान कुटुंबसंस्थेच्या काळापासून इतिहासकथनास प्रारंभ करता आला नसता असे नाही; परंतु मातृप्रधान कुटुंबात यद्यपि भाऊ, बहीण, आई व मामा ही चार नाती स्पष्ट दिसत होती तत्रापि बापाचा पत्ता अद्याप लागला नव्हता, त्यामुळे एकापुढे एक वंश सांगण्याची पंचाईत पडू लागली. तेव्हा, दुसराही पक्ष ह्या इतिहासकाराने सोडून दिला. शिल्लक राहिला तिसरा पक्ष पितृप्रधान कुंटुंबसंस्थेचा. ह्या संस्थेच्या काळापासून वंशपरंपरा जिला म्हणतात ती समाजात ठळकपणे उमटलेली दिसत होती. पणजा, आजा, बाप, मुलगा, नातू, पणतू अशी एकाला एक लागून वंशपरंपरा स्पष्ट ओळखता येत असल्यामुळे इतिहासरचनेचे कार्य सुरळीत भासले आणि म्हणूनच व्यासांनी प्रजापतिसंस्थेपासून भारतेतिहासाचा आदि केला आहे. मरीचि, अंगिरस, अत्रि, पुलस्त्य पुलह, ऋतु, वशिष्ठ हे सहा किंवा सात प्रजापति, व्यासांच्या इतिहासदृष्टीने सर्व सृष्टीचे उत्पादक होत. यांच्यापासून्देव, दानव, राक्षस, किन्नर, यक्ष, गंधर्व, अप्सरा, मानव, पशू, पक्षी, वृक्ष, नद्या व पर्वत उत्पन्न आले असे व्यासांचे मत होते. याच्यापूर्वी काय होते ते व्यासांना माहीत नाही. फक्त याच्या पूर्वी ब्रह्मदेव होता व त्याने मरीच्यादी सहा किंवा सात प्रजापती केवळ मन:संकल्पाने उत्पन्न केले. ह्या मरीच्यादींना व्यास बह्मदेवाचे मानसपुत्र म्हणून म्हणतो. आधुनिक दृष्टीने बोलावयाचे म्हणजे ज्यांची उत्पत्ती कोणापासून म्हणजे कोणत्या विवक्षित स्त्री-पुरुषांपासून झालेली सांगता येण्याचे साधन नाही, त्यांना मानसपुत्र म्हणून व्यास म्हणतो इतकेच. तात्पर्य, प्रजापतीच्या पूर्वीची माहिती व्यासाला फारशी नव्हती व ती असण्याचा संभवही नव्हता. पूर्व पुराणांतून, वेदांतून व दंतकथांवरून व्यासांना जी सर्व माहिती मिळाली तिच्यावरून त्यांनी असा कयास बांधला की प्रजापती हे मनुष्यसृष्टीचे आदि होत. प्रजापतीपासून कौरवपांडवांच्या काळापर्यंतची वंशपरंपरा बहुतेक बिनतूट अशी पुराणांवरून, वेदांवरून व दंतकथावरून जी त्यांना

उपलब्ध झाली ती त्यांनी प्रामाणिकपणाने जशीच्या तशी, विशेष फेरफार न करता दिलेली आहे, अशी सर्व भारत ग्रंथ पाहून माझी खात्री झालेली आहे. व्यासांच्या प्रामाणिकपणाबद्दल एकच एक मोठयांतले मोठे प्रमाण म्हणजे, स्वकालीन नीतिदृष्टया गर्ह्य वाटणाऱ्या अशा ना प्राचीन चाली, कोणाचीही व कशाचीही पर्वा भीडमुर्वत न धरिता, त्यांनी पुरातन इतिहास म्हणून, प्रांजलपणे लिहून ठेवण्यास माघार घेतली नाही, हे होय. सरमिसळ समागम, अतिथीला स्वस्त्रीसमर्पण, पशूसमागम, गुरूपत्नीगमन, बहुपतित्व, अल्पकालीन विवाह, अटींचे विवाह इत्यादी नीतिबाह्य चालींचा निर्देशच नव्हे तर तपशीलवार वृत्तांत स्थलोस्थली जो त्यांनी दिला आहे त्यावरून प्रामाणिक इतिहासकाराचे अवघड काम त्यांनी किती उत्कृष्टपणे पार पाडिले आहे, ते विशद होते. गर्ह्य व निंद्य म्हणून वरील चालींची हकीकत जर व्यासांनी दाबून टाकली असती, तर जगाच्या इतिहासाची केवढी भयंकर हानी झाली असती तिचा अंदाज समाजशास्त्राचे परिशीलन करणा-या विद्वानास यथायोग्य करता येतो. प्राजापति संस्था निर्माण झाल्यावर त्या संस्थेच्या पूर्वी ज्या विचित्र चाली समाजात रुढ होऊन बसल्या होत्या त्या समाजातून एकाएकी नाहीशा झाल्या नाहीत. त्यापैकी बहुतेक सर्व चाली नाना देश, नाना पोटसमाज यात प्रजापति संस्था निर्माण झाल्यानंतरही प्रचारात होत्या व पुरातनधर्म म्हणून लोकमान्य होत्या. त्यांचा तपशील न देण्याचे जरी व्यासांनी मनात आणले असते, तत्रापि त्यांनी पिढयानुपिढयांची परंपरागत मनोरचना त्यांच्या आड नि:संशय आली असती. जी भाषा, ज्या संस्था, जी परिस्थिती मनुष्याच्या मनाची रचना करते त्या भाषेला, संस्थांना व परिस्थितीला सोडून मनुष्य एक वाक्यही इतिहास म्हणून उच्चारू शकत नाही, अशी स्थिती मनुष्यमात्राच्या मनोरचनेची असल्याकारणाने गर्ह्य म्हणून अनेक प्राचीन चालींचा वृत्तांत व्यासांनी दाबून टाकण्याचा प्रयत्न केला असता तर एकच निष्पत्ती फळास आली असती. ती ही की, महाभारत म्हणून जो उत्कृष्ट इतिहास आज आपणास पाहावयास मिळतो तो मुदलातच लिहिला जाणे अशक्य झाले असते.

५. (१) पाशवावस्थेत वानरांतील एकपतिक सर्व भार्याक समाज, (२) मानवावस्थेतील बहुपतिक बहुभार्याक सरमिसळ करणारा समाज, (३) नंतर बहुस्वसृभार्याक बहुभ्रातृपतिक समाज, (४) नंतर बहुस्वसृभार्याक एकभ्रातृपतिक समाज आणि एकभार्याक बहुभ्रातृपतिक समाज, (५) आणि शेवटी बहुभार्याक एकपतिक समाज उर्फ प्रजापतिसंस्था. अशा परंपरेने प्राचीन आर्यसमाज ज्या काळी परिणत झाला त्या काळापासून व्यासांनी आपल्या भारतेतिहासाचा प्रारंभ केला आहे. मरीचि, प्रजापति, अत्रिप्रजापति, अंगिरस प्रजापति, पुलस्त्य प्रजापति, ऋतुप्रजापति, वसिष्ठप्रजापति, कर्दमप्रजापति, धर्मप्रजापति, वीर प्रजापति, अरण्यप्रजापति, प्राचीन बर्हिप्रजापति, दक्षप्रजापति, अंगप्रजापति, रुचिप्रजापति, सूर्यप्रजापति, मनुप्रजापति इत्यादी अनेक प्रजापतींची नावे भारतात व हरिवंशात दिलेली आहेत. अर्य लोकांत पितृप्रधान कुटुंबसंस्था म्हणजे पित्याच्या नावावरून पुत्राचे नाव ज्या कुटुंबसंस्थेत पडते ती संस्था प्रथम जेव्हा सुरू झाली तेव्हाच्या प्रसिद्ध कुटुंबसंस्थापक उर्फ कुलसंस्थापक कुलपतींची उर्फ प्रजापतींची ही नावे आहेत. या प्रजापतिक कुटुंबसंस्थेत सर्व स्त्रिया एका प्रजापतीच्या भार्या असल्यामुळे, समाजात इतर नर जे वयात येत त्यांना तीन मार्ग खुले असत. एक मार्ग म्हटला म्हणजे मूळ कुटुंबातून काही प्रिय स्त्रिया काढून नेऊन निराळे स्वतंत्र कुटुंब स्थापून स्वत: प्रजापती व्हावयाचे. दुसरा मार्ग म्हटला म्हणजे आजन्म अविवाहित राहावयाचे, व प्रजापतीच्या कुटुंबात भारभूत रिकामटेकडे न राहता अरण्यवास पतकरावयाचा. तिसरा मार्ग म्हटला म्हणजे प्रजापती कुटुंबाला सोडून देऊन दूरदेशी तत्प्रांतीय सरमिसळ समागम करणा-या मागसलेल्या रानटी समाजातील स्त्रियांशी प्रजापती नात्याने राहून पृथ्वीवर वसाह्ती करावयाच्या. ह्या तिन्ही मार्गांची वर्णने भारतेतिहासात आली आहेत. मूळ प्रजापतिक कुटुंबाच्या शेजारी स्वदेशातल्या स्वदेशात निराळी विभक्त प्रजापतिक कुटुंबे स्थापिली जाऊन आर्यसमाज बहुसंख्य होऊन आर्यप्रजावृद्धी कशी झाली याचा तपशील प्रस्तुत स्थळी देण्याचे कारण नाही. असा प्रकार झाला नसता तर ऋषींनी कुटुंबे व पुढे प्रजा जी इतकी बहुसंख्य झाली, ती झालेली न दिसती. प्रजापतिसंस्था बहुसंख्य झाल्याचे एकच शाब्दिक प्रमाण येथे देतो. कुटुंबाच्या मुख्य धन्याला प्रजापती हे जसे नामाभिधान मिळाले, तसेच प्रजापतीपासून झालेल्या प्रजेला प्रजा व प्रज हे नाव मिळाले. हा प्रज व प्रजा शब्द इतका प्रसिद्ध आहे की, दोनचारशे वर्षांपलीकडील जुन्या मराठी कागदपत्रांत शेतकरी या अर्थाने प्रज शब्द वापरलेला आधुनिक इतिहाससंशोधकांच्या चांगल्या परिचयाचा आहे. ऋग्वेदात ज व प्रज हे शब्द येतात. हेही सांगावयाला नकोच. देशातल्या देशात राहून प्रजापतिक कुटुंबस्थापकांचा जा पहिला मार्ग झाला. तिसरा मार्ग स्वदेशत्याग करून दूरदेशी वसाहत करणाऱ्यांचा. ह्या दूरदेशी वसाहत करणाऱ्यांचा उल्लेख

हरिवंशाच्या तिस-या अध्यायात आलेला आहे. दक्षप्रजापतीला वरीणप्रजापतीची मुलगी असिवकी इच्या पोटी पाच हजार पुत्र झाले. त्यांना बेसुमार प्रजावृद्धी करण्याच्या नैसर्गिक छंदात निमग्न होण्याच्या बेतात असलेले पाहून, नारदाने अर्थशास्त्रीय उपदेश करून दूरदेशी घालवून दिले. नारद म्हणाला, तुम्ही प्रजावृद्धी करू इच्छिता खरे, परंतु वर्धमान प्रजेला अन्न पुरविण्याचे पृथ्वीला सामर्थ्य कितपत आहे ते प्रथम पहा आणि मग प्रजावृद्धीच्या उद्योगाला लागा. नारदाचा हा उपदेश त्या पाच हजार पुत्रांना पटला व ते दूरदेशी जे अन्नशोधार्थ गेले ते पुन्हा परत आले नाहीत; बहुदा जिकडे गेले तिकडेच वसती करून कायमचे राहीले. अशा युक्तीने पाच हजार पुत्रांची वासलात लागल्यावर दक्षाने असिवकीच्या ठायी पुन: एक हजार पुत्र उत्पन्न केले, त्यांचीही वाट पूर्वीच्याचप्रमाणे नारदांनी लाविली. मूळ आर्य लोकांची फाटाफूट होऊन पूर्वेकडे , पश्चिमेकडे, दक्षिणेकडे व उत्तरेकड रशिया, जर्मनी, इटली, ग्रीस, हिंदुस्थान, तिबेट इत्यादी पृथ्वीभागात आर्य लोक अतिप्राचीन काळी जे पसरले त्या प्रसाराचा हा इतिहास आहे. विदेशगमनाच्या तिस-या मार्गाचा हा असा पौराणिक तपशील आहे. पहिल्या व तिस-या मार्गाचा खुलासा झाल्यावर, दुसरा मार्ग अविवाहित राहून अरण्यावास पत्करणाऱ्यांचा. त्याचा आता परामर्श घेऊ. युक्तीने प्रजापतीच्या कुटुंबातील चार स्त्रियांना भुलवून स्वदेशातल्या स्वदेशात स्वतंत्र व विभक्त निराळी कुटुंबे स्थापण्याचे कौशल्य व करामत ज्यांच्या अंगी होती ते स्वदेशातच राहिले आणि ज्यांच्या अंगात विशेष धाडस व साहस होते त्यांनी परदेश पत्करला; परंतु भिडस्त व पापभिरू स्त्रियांशी विशेष लगट करण्याचा ज्यांना सौजन्यामुळे कंटाळा, प्रजापतीशी भांडण तंटा करण्याचा ज्यांचा मूळ स्वभाव नव्हे, असे जे थोडे सत्वशील पुरूष होते त्यांनी प्रजापतींच्या कुटुंबातून कोणालाही न दुखाविता, देशातील निर्जन अरण्ये व गिरिकंदरे व नदीतटाके यात कुटया व आश्रम करून राहण्याचा बिनबोभाट मार्ग स्वीकारला. हरिवंशाच्या पहिल्या अध्यायात ब्रह्मदेवाचे सनकसनंदनादि जे सात पुत्र सांगितले आहेत ते या सत्वशील वर्गापैकी अत्यंत पुरातन व इतिहासात दाखल झालेले पाहिले होते. ह्या सत्वशीलांच्या निरूपद्रवी मार्गाला ब्रह्मचर्याचा मार्ग असे जगविख्यात व सर्वश्रुत नाव पुढे कालांतराने मिळालेले आहे. एकपतिक, बहुभार्याक प्रजापतिक समाजात पंगू, दुबळया व सत्वशील अशा इसमांवर व तरूण लोकांवर अपत्नीक राहण्याचा बलिष्ठ प्रजापतींच्या अमलात जबरदस्तीने प्रसंग असाच सर्वत्र ओढवत असलेला पृथ्वीवरील अनेक रानटी समाजात दृष्टीस पडतो. The Plurality of wives becomes the previlege of small number of the strongest and the most feared, the Chiefs, the Sorcerers, or the priests, where there are any. In Australia, for example, the adult men take possession of the woman of all ages, and in consequence, the greater number of young men cannot become proprietors of a woman before the age of about thirty years. Among the Ancas or Arancanos of South America the poor of the people are frequently reduced to remain celibate, ( Latourneau, P. 130 ). Polygamy is the luxury of the rich or chiefs ( P. 133). बहुपत्नीत्व हा मूठभर सामर्थ्यवान, ज्यांची दहशत असते असे सरदार, मांत्रिक, आणि जेथे असतील तेथे धर्मगुरू यांचा खास अधिकार बनतो. उदाहरणार्थ ऑस्ट्रेलियात तरूण पुरूष सर्व वयाच्या स्त्रियांवर मालकी प्रस्थापित करतात. परिणामी युवकांना ते जवळ जवळ तीस वर्षांचे होईतो स्त्री मिळत नाही. दक्षिण अमेरिकेतील अनकास किंवा अरनकानोस यांच्यातील गरिबांना ब्रह्मचारीच राहावे लागते. ( लिटोर्न्यू पृ. १३०). बहुपत्नीत्व ही श्रीमंतांची आणि राजेरजवाडयांची चैनबाजी असते. ( पृ. १३३)

बलिष्ठ प्रजापतींच्या अरेरावी व आपलपोटया जुलमाने अपत्नीक रहाण्याचा दुर्धर प्रसंग ज्याच्यावर ओढवतो अशा लोकात धटटयाकटटया परंतु बिनवजन तरूणाखेरीज पंगू व दुबळया लोकांचा समावेश होतो. पैकी पंगू ब दुबळे दैवगतीने अनन्यगतिक असल्यामुळे त्यांच्या हातून रानावनात व गिरिगव्हरात जाऊन राहण्याचा खडतर मार्ग अवलंबिला जाणे संभाव्य सुद्धा नाही. सबब, उत्साही परंतु सत्वशील व पराक्रमी परंतु इंद्रियनिग्रही असे जे थोडे तरूण लोक ऋषिलोकांच्या प्राजापतिक समाजात असत त्यांनी हा ब्रह्मचर्याचा मार्ग स्वीकारलेला आहे. भारतेतिहासकार जे व्यास त्यांनी सनकननंदनादी सातांचाच जरी ग्रंथारंभी प्रामुख्याने उल्लेख केला आहे व तोही प्रजापतिसंस्थेच्या अनुषंगाने केला आहे, तत्रापि ह्या सनकसनन्दनाच्याही फार पूर्वीच्या प्राचीन काळापासून अपत्नीक अशा ब्रह्मचाऱ्यांची परंपरा चालत आलेली आहे. इतकेच की, जुलमी प्रजापतीच्या काळी ही संस्था विशेष उठावाने लोकांच्या नजरेत भरू लागली. शिवाय सनकसनंदनादी योगसंपन्न पुरुष प्रजापतिकाली उत्पन्न जे झाले ते एकाएकी आकाशातून ज्ञान घेऊन पृथ्वीवर उतरले अशीही विपरीत समजूत करून घेण्यात समंजसपना नाही. ज्ञानाची व योगाची कित्येक पिढयांची काहीतरी पूर्वपरंपरा असल्याबिगर, सनकसनंदनासारखे योगी व ज्ञानी निपजत नसतात. तात्पर्य, ब्रह्मचर्यसंस्था

प्रजापतिसंस्थेच्या समकालीनच नव्हे तर तीहून बरीच जुनी आहे. ब्रह्मचारी या शब्दाचा मूलार्थ ब्रह्मात चालणारा असा आहे. ब्रह्मात चालणारा म्हणजे घरदार सोडून मोठया व विस्तीर्ण जगात एकाकी भ्रमण करणारा. ब्रह्मन म्हणजे मोठे, ब्रह्मन म्हणजे समाजाच्या राहण्याच्या स्थालाहून मोठे असे जे अफाट पृथ्वीफलक ते ब्रह्मन. म्हणजे विस्तीर्ण व अमर्याद जग, त्यात संचार करणारा तो ब्रह्मचारी. जबरदस्त प्रजापतीच्या जुलमाने वैतागून जाऊन अफाट जगाचा ज्याने रस्ता सुधारला तो ब्रह्माचारी, घर सोडून अनिकेतन जो बनला म्हणजे प्राजापतिक कुटुंबाबाहेर जो पडला तो ब्रह्मचारी. ब्रह्मचारी अरण्यात व गिरिगव्हरात एकान्तात राहू लागल्याकारणाने, इतर जमावांशी मारामाऱ्या, घरघुती तंटेबखेडे, स्त्रीसंबंधक मात्सर्यादी दोष, अन्नार्थ वन्य व ग्राम्य पश्वादींची हिंसा, पोराबाळांच्या पोटापाण्याची तरतूद करण्याची जबाबदारी इत्यादी काळज्यांतून मुक्त होऊन, त्यांना समाजाचे, लोकांचे व जगताचे चिंतन करण्याला मनमुराद अवधी व स्वास्थ्य मिळाले, आणि ह्या स्वास्थ्याचा आत्मानंदार्थ व लोकोपकारार्थ त्यांनी त्या त्या कालाला व परिस्थितीला अनुरूप असा चांगला उपयोग केला. ऋषिसमाजात ज्या ज्या म्हणून सुधारणा, जी जी म्हणून शास्त्रे व जे जे म्हणून धर्म उदयास आले, त्यांचे त्यांचे आद्यप्रवर्तक हे ब्रह्मचारी तपस्वी लोक होते. त्या प्राचीन काळी ब्रह्मचर्याखेरीज इतर कोणत्याही आश्रमाने इतके परिपूर्ण स्वास्थ्य मिळण्यासारखे नव्हते. ते स्वास्थ्य प्रजापतींच्या जुलमाने आर्य समाजातील काही सत्वशील पुरूषांस मिळून ब्रह्मचर्यसंस्था उदयास आली. असली ही थोर संस्था तत्कालीन किंवा अर्वाचीन इतर रानटी समाजात कोठेही निघाल्याचे इतर कोणत्याही इतिहासात नमूद नाही. रानटी आर्य लोकांत जो मोठा भेद प्रथमदर्शनी अवलोकनात येतो तो हाच होय. इतर रानटी लोकांत जुलमी प्रजापतीच्या जबरदस्तीला कंटाळून घराबाहेर व प्रजापती कुटुंबाबाहेर जे तरूण लोक पडतात ते फार तर शेजारी किंवा दूरदेशी स्वतंत्र व विभक्त प्रजापतिसंस्था स्थापतात; परंतु आजन्म अपत्नीक व ब्रह्मचारी राहून आत्मानंदात किंवा लोकोपकारात आयुष्य खर्च करीत असलेले आढळत नाहीत, निदान प्रवाशांनी व निरिक्षकांनी तसा दाखला कोठे टिपून ठेवलेला आढळत नाही. आर्य लोकांतील ह्या ब्रह्मचाऱ्यांजवळ आर्य लोकच केवळ नव्हेत, तर देव म्हणून जे श्रेष्ठ लोक होते तेही भीत अशी शेकडो वर्णने भारतात आहेत. ब्रह्मचाऱ्याजवळ अशी कोणती जादू होती की, जिच्यामुळे मानवच नव्हेत तर देवसुद्धा त्यांना वचकत ? ही जादू दुसरी तिसरी कोणतीही नसून सर्वाभूती समदृष्टी ही होय. समदृष्टीत्वामुळे, ब्रह्मचा-यांना सर्व लोक रानातील अनार्य, व म्लेंछ लोक देखील, वश असत, व त्यांची आज्ञा शिरसामान्य करीत. असे हे हत्यार जवळ असल्याकारणाने, प्रजापति, अधिराजे व इंद्रादी देवदेवेश्वरही ब्रह्मचाऱ्यांना वचकून असत आणि वचकासारखी वजनदारी पृथ्वीवर दुसरी कोणतीच नाही. ब्रह्मचाऱ्यांच्या वचकाचा आदर प्रजापतिकालानंतर इतका वाढला की, संपूर्ण आर्य समाजाचे अध्यापकत्व ब्रह्मचाऱ्याकडे आले, व ब्रह्मचाऱ्याचे अनुकरण आर्यलोकांतील तरूण स्त्रीपुरुषांनी नियमाने केलेच पाहिजे, असा दंडक निर्माण झाला. प्रत्येक आर्य प्रथम ब्रह्मचर्याश्रमातून तावून सुलाखून पुन: जन्म घेई व द्विज या सन्मान्य पदवीस आपणास पात्र करून घेई.

७. येणेप्रमाणे प्रजापतिसंस्थेपासून प्राचीन आर्य समाजात तीन मोठे मोठे परिणाम झाले. प्राजापतिक कुले विभक्तपणे स्थपिण्याचा क्रम सुरू झाला, हा पहिला परिणाम. दूरदेशी वसाहत करण्याचा प्रघात पडला हा दुसरा परिणाम. बहुभार्योक व एकपतिक प्रजापतिसंस्थेत पुढे कोणकोणते फेरफार कसकसे होत गेले, हा तपशील भारतेतिहासावरून महर्षि व ब्रह्मचारी जे व्यास त्यांच्या अनुसंधानापुढील कित्येक टिपणांतून यथास्थल नमूद होईल.

**********

प्रकरण ३ रे

# आतिथ्याची एक आर्ष चाल

३. आतिथ्याची एक आर्ष चाल

(१) अथेन्स शहरातील तत्वज्ञ साक्रेटिस ( सुक्रतुस ) याने आपली स्त्री झांटिप हिला आपला स्नेही अल्कि बियाडिस याला संभोगार्थ दिली, तसेच रोम शहरातील प्रसिद्ध मुत्सद्दी केटो याने आपली स्त्री मर्शिया हिला आपला स्नेही होर्टेन्शियस याला त्याच कार्याकरिता दिली, असे प्लूटार्क लिहितो ( प्लूटार्ककृत केटो ). मित्राला स्वस्त्री उपभोगार्थ देण्यात कोणत्याही नीतिचा भंग झाला असे तत्कालीन ग्रीक व रोमन समाजाला वाटत नव्हते, हा ह्या उदाहरणाचा अर्थ. आपल्या इकडे भारतवर्षात प्राचीन काळी या मुद्दयासंबंधाने काय स्थिती होती ती भारतादी ग्रंथावरून निश्चित करू. उद्योगपर्वाच्या ४५ व्या अध्यायात खरे मित्रत्व कशाला म्हणतात ते सनत्सुजात सांगतात, आणि ख-या मित्रत्वाचे जे सहा गुण त्यांपैकी खालील गुणांचा निर्देश करतात-

"संकटसमयी मित्राला आपली स्त्रीदेखील निर्मळ अंत:करणाने अर्पण करावी." ( इष्टान् पुत्रान विभवान् स्वाञ्श्च दारान् )

सनत्सुजात म्हणजे कोणी अलबत्ये गलबत्ये वाचाट माणूस नव्हते. महान् तपस्वी व तत्ववेत्ते म्हणून ते भारतात प्रसिद्ध होते. ते ही मित्रनीती सांगत आहेत. तेव्हा एकेकाळी भारतीयांत मित्राला स्वस्त्रीसंभोगार्थ देण्यात नीतिभंग होतो असे मानीत नव्हते, असे विधान सप्रमाण करता येते. या विधानाचे पोषण पाणिनीच्या एका सूत्राच्या आधाराने करता येते. द्विगोर्लुगनपत्ये ( ४-१-८८ ) या सूत्राच्या अनुषंगाने द्वैमित्रि: हा तद्धित पाणिनि सांगतो. द्वयोर्मित्रयोरपत्यं द्वैमित्रि । दोन मित्रांच्या अपत्याला द्वैमित्रि म्हणतात. एका मित्राने आपली बायको काही काल ग्राम्यधर्मार्थ आपल्या मित्राला दिली आणि मित्रापाशी राहून त्या बायकोला अपत्य झाले, तर बायको शास्त्रत: एकाची व मूल झाले दुस-या मित्राच्या समागमापासून, अशा स्थितीत पितृत्व सामान्य जनप्रवादाने दोघाही मित्रांकडे येई. शास्त्रत: नव-याकडे, समागमत: दुस-या मित्रांकडे सबब मुलाला द्वैमित्रि म्हणतात. पाणिनीकाली मित्राला ग्राम्यधर्मार्थ स्वस्त्री देण्याची चाल होती, हे सिद्ध. ग्रीस व रोम या देशांत जी चाल होती तीच चाल पाणिनिकाली भारतवर्षात होती.

(२) दोघा जीवश्च कंठश्च मित्रांमध्ये स्त्रीविनिमय होणे जसे नीतिबाह्य समजत नसत तसेच अनोळखी अतिथीला स्वस्त्री किंवा स्वदासी देण्यात एकेकाळी धर्म समजत असत.

शांतिपर्वाच्या १६८ च्या अध्यायात गौतम नावाच्या ब्राह्मणाला अतिथिसत्कार म्हणून इतर वस्तूंबरोबर कोण्या शबराने एक गतभर्तृका दासी दिल्याचा वृत्तांत आहे. कोणी सन्मान्य अतिथि आला असता, त्याला दासी देण्याची चाल भारतवर्षात पुरातन काळी सर्वमान्य होती, व अलीकडे पेशवाईतही ही चाल प्रचलित होती. पेशवाईतील कित्येक सरंजामदारांत अतिथिसत्काराची अशि चाल होती म्हणून सांगतात की अतिथीची चंची तांबुलादी द्रव्यांनी नित्य भरून ठेवावयाची व सेवा करण्याकरिता रात्रौ एखादी ठेंगणी ठुसकी दासी अतिथीकडे पाठवायची. कृष्ण, अर्जुन इत्यादी अतिथींना दासी दिल्याचे उल्लेख अनेक आहेत. आता केवळ दासी अतिथीकडे पाठविण्यात विशेष मातब्बरी दिसत नाही; कारण दासी म्हणजे बोलून चालून गुलाम. परंतु घरधन्याने किंवा गृहस्थाने आपल्या यज्ञपत्नीला अतिथीची ग्राम्यधर्माने सेवा करण्यास सांगितल्याचाही दाखला भारतवर्षात पाहावयास मिळतो. अनुशासन पर्वाच्या दुस-या अध्यायात सुदर्शनाची कथा आहे. सुदर्शन आपली भार्या ओघवती हिला सांगतो की, " गृहस्थाश्रमधर्माने माझी वागावयाची प्रतिज्ञा आहे, सबब अतिथीला प्रतिकूल असे कोणतेही वर्तन तू करू नयेस; इतकेच नव्हे तर प्रसंगी स्वत:चे शरीरही अतिथीला देण्यास मागेपुढे पाहू नकोस." नव-याची ही आज्ञा बायकोने शिरसावंदन केली. पुढे लवकरच परीक्षेची वेळ आली. सुदर्शनाच्या गैरहजेरीत एक ब्राह्मण अतिथी आश्रमात आला. अर्घ्यपाद्यादिपूजा यथाविधी घेतल्यावर अतिथीने सुदर्शनस्त्रीस संभोगेच्छा असल्याचे दर्शविले, तेव्हा अतिथीचा अवमान करावयचा नाही या धर्माने ओघवतीने ब्राह्मणाची इच्छा पूर्ण केली. इतक्यात सुदर्शनऋषि घरी परत आले व त्यांना हा आतिथ्यप्रकार कळला. तेव्हा आपण आज धन्य झालो असे त्यांनी उद्गार काढिले व आपल्या बायकोची पातिव्रत्यधर्माबद्दल पाठ थोपटली. पितामह भीष्म धर्मराजाला सांगतात की ह्या सत्कृत्यामुळे सुदर्शनाची कीर्ती भुवनत्रयांत अक्षय्य पसरली. व त्याला इंद्रलोक प्राप्त झाला. एके काली स्वस्त्रीही अतिथीला अर्पण करण्याची चाल भारतीय आर्यात होती, याला या कथेतून दुसरा आधार धुंडाळण्याची जरूर नाही. ऑस्ट्रेलिया, आफ्रिका, पॉलिनेशिया, मोंगोलिया आणि इतर बहुतेक सर्व देशांतील प्राचीन व अर्वाचीन रानटी व सुधारलेल्या समाजातील अतिथिपूजनाची ही चाल प्राचीन भारतीय आर्यात व

अनार्यातही आढळावी हे काही एका संस्कृतीतील मनुष्यस्वभावास अनुरूपच आहे.

(३) सुदर्शन्कालीन अतिथीला स्वस्त्रीसमर्पण करण्याच्या ह्या चालीला पुढे आस्ते आस्ते आळा पडल्याचाही दाखला भारतात नमूद आहे. शांतिपर्वाच्या २६६ व्या अध्यायात चिरकारीची कथा भीष्मांनी युधिष्ठीराला सांगितलेली पाहावी. चिरकारीचा पिता गौतम अन्यत्र गुंतला असता इंद्र गौतमाश्रमात अतिथी म्हणून आला आणि चिरकारीच्या मातेशी संभोग करून चालता झाला. हे वृत्त गौतामास कळल्यावर गौतमाने चिरकारीस आपल्या मातेचा वध करण्यास पहिल्या झटक्यासरशी सांगितले व आपण रागे रागे अरण्याचा रस्ता धरिला. इकडे मातेचा वध न करिता, चिरकारी तसाच राहिला. अरण्यांत राग शांत झाल्यावर गौतमाला स्वस्त्रीचा पुत्राने वध केला असेल या निश्चितीने फार वाईट वाटले. तो म्हणाला, अतिथिसमागमांच्या असल्या अस्पष्ट अपराधाकरिता स्त्रीचा वध करणे अधर्म्य होय. नंतर पश्चाताप होऊन घरी आल्यानंतर, पुत्राने स्त्रीस ठार मारिले नाही असे पाहून, त्या ऋषीने चिरकारीची प्रशंसा केली. ह्या गौतमाच्या कथेत व मागील सुदर्शनाच्या कथेत अतंर आहे. सुदर्शन व गौतम दोघेही अतिथीला स्वस्त्रीसमर्पण करणे हा धर्म समजतात; परंतु ह्या धर्माने सुदर्शनाला कृतकृत्यता वाटते, तर गौतमाला पहिल्या झटक्यात क्रोध येतो. विचारांती स्वस्त्रीने अतिथिधर्म पाळण्यात जे केले ते धर्म्यच केले असे गौतमाला वाटले. याचा अर्थ इतकाच की ही अतिथीपूजनाची चाल समाजांत किंचित् गर्ह्य समजली जाऊ लागली होती, परंतु ह्या चालीचा पगडा अद्याप व्हावा तितका शिथिल झाला नव्हता.

(४) यापुढील पायरी म्हणजे अतिथीला स्त्रीनिवेदन न करण्याची. ह्या पायरीचे उत्कृष्ट उदाहरण म्हटले म्हणजे सर्वप्रसिद्ध जमदग्नीचे. जमदग्नीची बायको रेणुका हिने चित्ररथ गंधर्वाकडे नुसते सकामदृष्टीने पाहिले, तेणेकरून कोपविष्ट होऊन जमदग्नीने आपला मुलगा परशुराम याजकडून तिला ठार केले. मानसिकही व्यभिचार ज्याला खपला नाही, त्या जमदग्नीने अतिथीला स्वस्त्रीसमर्पण कितपत सहन केले असते ते सांगावयाला नकोच. सुदर्शनाच्या कथेत अतिथीला संभोग देणे हे दोघा नवराबायकोंना संमत होते. गौतमाच्या कथेत स्वस्त्रीदान नवऱ्याला पसंत नव्हते, परंतु बायकोला व मुलाला पसंत होते. परशुरामाच्या कथेत बापाला व मुलाला दोघांनाही स्वस्त्रीसमर्पण नापसंत होते, स्वत: स्त्रीला पसंत होते किंवा नाही ते सांगवत नाही.

(५) या पुढील पायरी राम व सीता यांची. रावण अतिथीच वेश घेऊन सीतेपुढे आला व तिला तिच्या इच्छेविरुद्ध बळजबरीने घेऊन पळाला. अतिथीला स्वशरीर समर्पण करण्याची चाल जर सीतेला मान्य असती, तर रामायणाचा पुढील कथाभाग झालाच नसता. रामाला व लक्ष्मणाला व तत्कालीन तमाम भारतीय समाजाला ही स्त्रीसमर्पणाची चाल बरीच गर्ह्य वाटू लागत चालली होती. तथापि पाणिनिकाली ह्या चालीच किंचित् अवशेष तुरळक तुरळक राहिलेला होता हे द्वैमित्रि या तद्धितावरून ताडता येते.

(६) मित्राला अगर अतिथीला उर्फ पाहुण्याला दासी किंवा स्वस्त्री आदराने समर्पण करण्याची चाल सुदर्शनाच्या कालापासून तो पाणिनीच्या कालापर्यंत एका प्राचीनतम चालीचा अवशेष म्हणून राहिलेली आहे. प्राचीनतम रानटी टोळयांत स्त्री हा अर्थ इतर गाई, बैल, घर इत्यादी जिनगीप्रमाणे मालकाच्या म्हणजे पुरूषाच्या मालकीचा समजत असत. स्त्री ह्या वस्तूचा जिनगीत समावेश होत असे. अगदी अलीकडील जो कालिदास तो "कन्या हि अर्थो परकीय एव" असे म्हणताना स्त्रियांना पर्यायाने अर्थात म्हणजे जिनगीत गोवतो. जिनगीचा म्हणजे मालकीच्या वस्तूचा मालक वाटेल तो विनियोग करू शकतो. म्हणजे विकणे, मारणे, ठार मारणे, दान देणे, घालवून देणे, इत्यादी चाहेल तो विनियोग स्त्री या अर्थाचा रानटी माणूस करू शके. स्त्री हा जिन्नस मालकीचा समजला गेल्यावर तिला मित्रास किंवा आदरणीय पाहुण्यांस संभोगार्थ देऊन टाकण्याचा अधिकार सहजच उत्पन्न होतो.

(७) स्त्रियांवर पुरुषांची मालकी केव्हा उत्पन्न झाली ? मनुष्य हा पशुकोटीतील प्राणी आहे व त्याचे अगदी जवळचे सगेसोयरे पशू म्हटले म्हणजे वानर होत. वानरांतील हुप्या इतर लहानमोठया वानरांना मारून किंवा हाकलून कळपातील सर्व माद्यांवर प्रजापतित्वाचा हक्क बजावतो. म्हणजे हुप्या बहुपत्नीक असतो. पाशवदशेत माणूसही बहुपत्नीक असावा असे उपमानप्रमाणाने म्हणावे लागते. पुढे कालांतराने लढाया, मारामाऱ्या, मित्रत्व इत्यादी कारणांनी पाशव दशेतील बहुपत्नीक माणसांच्या स्वसंरक्षणार्थ जूट, जमाव किंवा टोळया झाल्या. या टोळयांत सर्व नर सर्व माद्यांचे म्हणजे सर्व पुरूष सर्व स्त्रियांचे मालक बनले. टोळीतील सर्व स्त्रिया सर्व पुरूषांना सारख्याच उपभोग्य झाल्या. समजा की टोळीतील एखादा पुरूष किंवा काही पुरूष कोणत्याही कारणाने दूरदेशात परागंदा झाले, आणि कालांतराने पुन: स्वत:च्या टोळीची व त्यांची गाठ पडली, तर ह्या पाहुण्यांना टोळीतील स्त्रियांशी शरीरव्यवहार करण्यास कोणतीच अडचण टोळीतील स्त्रीपुरूष समाजाकडून पडणार नाही; कारण पाहुणे आपल्याच टोळीपैकी आहेत अशी भावना असते. मुळात पाशव माणूस बहुपत्नीक होता. तो टोळया

करून राहू लागल्यावर बहुपत्नीकत्व व बहुपतित्व टोळयांत उत्पन्न झाले. अशा समाजात पुढे आवडनिवड उत्पन्न होऊन मिथुनधर्माने राहण्याची चाल आस्ते आस्ते मागे पडली, परंतु नैसर्गिक पुराणप्रियतेमुळे पूर्वीची बहुपत्नीत्व ही चाल एकाएकी मोडवेना. सबब, जुना मित्र किंवा परागंदा झालेला दूरदेशस्थ पाहुणा आल्यास त्याला स्वत:ची नवीन मिथुनधर्मस्य स्त्री जुन्या यूथधर्मातील सामान्य पतित्वाच्या चालीला मान देऊन आदराने समर्पण करण्यात लोक भूषण व संभावितपणा मानू लागले. ही चाल पाणिनीपर्यंत व पेशवाईपर्यंत थोडीफार अवशिष्ट राहिली. समाजशास्त्रांतील एक नियमच आहे की, चाली मरता मरत नाहीत, मोठया पराकाष्ठेच्या चिवट असतात.

(८) केवळ पाशवास्थेत एक पुरुष व अनेक स्त्रिया असा समाज असे. नंतर यूथावस्थेत अनेक पुरुष व अनेक स्त्रिया सरमिसळ राहून समाज घटला. पुढे आवडनिवड सुरू होऊन मिथुनावस्था हळूहळू अमलात आली आणि शेवटी एक पुरुष आणि एक स्त्री अशी व्यवस्था बहुत प्रयासाने प्रचलित झाली. ती अद्याप भारतीय समाजात पूर्णपणे अमलात यावयाचीच आहे. हाच अर्थ शांतिपर्वाच्या २०७ व्या अध्यायात पुराणेतिहासज्ञ जे भीष्म त्यांनी खालील श्लोकांत वर्णिला आहे.

कृतयुगे ........... ........... ............... ॥
न चैषां मैथुनो धर्मो बभूव भरतर्षभ ॥
संकल्पादेवैतेषां अपत्यमुपपद्यते ॥ ३७ ॥
ततस्त्रेतायुगे काले संस्पर्शाज्जायते प्रजा ॥
न ह्यभून्मैथुनो धर्मस्तेषामपि जनाधिप ॥ ३८ ॥
द्वापरे मैथुनो धर्म: प्रजानामभवन्नृप ॥
तथा कलियुगे राजन् द्वंद्व मापेदिरे जना: ॥ ३९ ॥

(१) कृतयुगी स्त्री-पुरुषांच्या मनात आले म्हणजे समागम होत असे. आई, बाप, भाऊ, बहीण हा भेद नव्हता. ही यूथावस्था होय. (२) त्रेतायुगात स्त्रीपुरूषांनी अन्योन्य स्पर्श केला म्हणजे समाज त्या स्त्रीपुरूषांना तेवढयापुरता समागम करण्यास परवानगी देई. ही आवडीनिवडीची किंवा इष्टा-निष्टावरणावस्था होय. (३) द्वापारयुगी मैथुन-धर्म सुरू झाला. म्हणजे टोळीत जोडप्याजोडप्यांनी स्त्रीपुरूष राहू लागले, परंतु अद्याप या जोडप्यांना स्थिरावस्था प्राप्त झालेली नव्हती. (४) आणि कलियुगात द्वंद्वावस्था परिणतीस आली, म्हणजे विवाहसंस्था म्हणून जीस म्हणतात ती उदयास आली. इतक्या प्राचीन काली समाजशास्त्रीय परंपरा इतकी नामी सांगणाऱ्या भीष्माविषयी सध्या देखील परम आदर उत्पन्न होतो !

(९) (१) भीष्मांनी वर्णिलेली कृतयुगातील संकल्पावस्था--म्हणजे वेळेस वाटेल त्या स्त्रीपुरूषांचा वाटेल त्या स्त्रीपुरूषांशी समागम होणे केवळ काल्पनिक अशी भीष्मांनी आपल्या डोक्यातून काढलेली नाही. अशी संकल्पावस्था अद्यापही वन्य मनुष्यांत आढळते. The indigenous Indians of Ca;lifornia, who are among the lowest of human races, couple after the maaner of inferior mammals, without the least formality, and according to the caprice of the moment. कॅलिफोर्नियातील मूळ इंडियन, जे सर्वात खालच्या पातळीवरील माणसे आहेत, ते अतिशय कनिष्ठ सस्तन प्राण्याप्रमाणे संभोग करतात. ह्यांना काहीही सभ्यता नसते आणि मनाला येईल तेव्हा ते संभोग करतात. ( Evolution of Marriage by Letourneau Page 43, 3rd edition ).

(२) त्रेतायुगात अन्योन्यस्पर्श म्हणजे हाताने किंवा अंगुलीने परस्परस्पर्श करून संभोगेच्छा दर्शविण्याची चाल टोळीतील समाजास मान्य झाली. ह्या हस्तादिकांच्या स्पर्शनावरून कालांतराने भारतीयांत जी विवाहसंस्था परिणत झाली तीतील विवाहास पाणिपीडन किंवा हस्तग्रहण हे नाव पडलेले आहे. आश्वलायन गृह्यसूत्रातील पहिल्या अध्यायाच्या सातव्या खंडात विवाहविधीची प्रक्रिया सांगितली आहे. तीत, (१) गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं इति अंगुष्ठमेव गृह्णीयाद् यदि कामयति पुमांस एव मे पुत्रा जायेरन्निति, (२) अंगुलीरेव स्त्रीकाम:, आणि (३) रोमान्ते हस्तं सांगुष्ठ मुभयकाम:, असे तीन प्रकार स्पर्शाचे उर्फ पाणिपीडनाचे दिले आहेत. म्हणजे मुलगे पाहिजे असल्यास नव-याने नवरीचा अंगठा धरावा, मुलगी पाहिजे असल्यास फक्त अंगुळया धराव्या, आणि दोन्ही पाहिजे असतील तर केसापर्यंतचा हात अंगठयासह धरावा. आश्वलायन गृह्यसूत्रातील ह्या तिन्ही तऱ्हा त्रेतायुगातील स्पर्शावस्थेतील आहेत. त्रेतायुगात एक रानटी टोळी पुरुषप्रधान असून तिच्यात धरून आणिलेल्या स्त्रीचा अंगठा पकडण्याची चाल होती. दुसरी टोळी स्त्रीप्रधान असून तिच्यात वेठबिगार करून नवरी मिळविणारा नवरा नवरीच्या फक्त अंगुल्या अलगत धरी, आणि तिसरी एक टोळी स्त्रीपुरुषांचे समानत्व मानणारी होती. तीत नवरीचे मनगट नवरा खुशाल धरी. हे तिन्ही समाज

एकवटून वैदिक समाज बनला, आणि अर्थात् या तिन्ही चाली वैदिक समाजात प्रचलित असलेला गृह्यसूत्रकार जो शौनक त्याने नमूद करून ठेविल्या. पुरूषप्रधान समाज अंगुष्ठ धरी, सबब अंगुष्ठ धरिले असता मुलगे होतात अशी भावना झाली. स्त्रीप्रधान टोळी अंगुल्या धरी, सबब अंगुल्या धरिल्या असता मुली होतात असा समज फैलावला, आणि तिसरी टोळी, अंगुष्ठ, अंगुली व मनगट धरी, त्यावरून मनगट धरिले असता मुली व मुलगे दोन्ही होतात अशी समजूत रूढ झाली.

(३) द्वापारयुगी मिथुनावस्था समाजाला आली. काही काल स्थिर राहणा-या जोडप्यांनी प्रजोत्पादन करण्याची पद्धती उदयास आली. त्रेतायुगात सर्व मुले सर्व समाजाची उर्फ सबंध टोळीची समजत. सर्व बाप्ये जे सर्व मुलांचे बाप आणि सर्व स्त्रिया सर्व मुलांच्या आया एवढाच संबंध त्रेतायुगात अस्तित्वात होता. द्वापारयुगात मिथुनावस्था प्रचलित झाल्यावर मुलाचा बाप अमुक व आई अमुक इत्यादी वैशिष्टीकरण आस्ते आस्ते उद्भूत झाले. आणि--

(४) कलियुगात द्वंद्वावस्था म्हणजे विवाहसंस्था प्रचलित झाल्यावर पिता, पुत्र, भ्राता, भगिनी, चुलता, मामा, आई, पणजी इत्यादी वर्तमानकालीन नाती क्रमाक्रमाने समाजाच्या अनुभवास येऊ लागली. एकंदरीत भीष्मांनी वर्णिलेल्या निरनिराळया युगांतील स्थिती ऐतिहासिक आहे, व इतक्या प्राचीन काली ती इतक्या उत्कृष्ट तऱ्हेने मांडल्याबद्दल त्या थोर बुद्धिमान पुरुषाचे आपण ऋणी आहोत. द्वापारयुगी मिथुनधर्म प्रचलित झाला म्हणून सांगितले. तत्संबंधी तपशीलवार विवेचन पुढील निबंधात करू.

**********

प्रकरण ४ थे

# अग्नि व यज्ञ

(१) भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास व पारंपारिक तपशील सांगावयाचा म्हटला म्हणजे अग्नि ह्या पदार्थाचा थोडासा सामाजिक इतिहास सांगावा लागतो. अग्नीला साक्ष ठेवून सध्याचे भारतवर्षीय त्रैवर्णिक हिंदू लोक विवाहसंपादन करतात. अग्नीची साक्ष नसेल, तर तो विवाह धर्म्य समजला जात नाही. येथे असा प्रश्न उद्भवतो की, अग्नीचा व विवाहाचा संबंध काय ? विवाहाग्नी, गृह्याग्नी, आवसथ्याग्नी, औपासनाग्नी इत्यादी शब्दांत विवाह व अग्नी, गृह व अग्नी, उपासना व अग्नी ह्या द्वंद्वाचा नित्य संबंध सांगितलेला आढळतो तो काय म्हणून ? अग्नीने रानटी आर्यांचे असे कोणते कार्य केले होते की जेथे तेथे त्यांनी अग्नीचे आवाहन करावे ? इत्यादी प्रश्नांना उत्तर द्यावयाचे म्हणजे रानटी आर्यांची पुरातन काळी सामाजिक व भौम स्थिती काय होती ते पाहावे लागते.

(२) ऋषींचे अतिप्राचीन पूर्वज वानरीय पाशवावस्थेत असताना, वानरांप्रमाणे त्यांनाही झाडे, पर्वतांचे कपरे, गुहा वगैरेंच्या आश्रयाने राहून हिंस्त्र पशूंपासून, वादळांपासून व थंडीवाऱ्यापासून आपला बचाव मोठ्या संकटाने करावा लागे. अशा दुरवस्थेत पशूंहून व पक्ष्यांहूनही कष्टतर स्थिती पशुतुल्य ऋषिपूर्वजांची असे. जी दुरवस्था गाई, बकरे किंवा हरणे यांची व्याघ्रसिंहादी हिंस्त्र श्वापदांच्या पुढे होते, त्याहूनही अधम अवस्था पाशवावस्थेतील मनुष्याची असे. हरणे वगैरेंचा बचावाकरिता शिंगे, दाढा, टापा वगैरे सहज शस्त्रे तरी असतात, मनुष्यांना तीही नाहीत. फक्त अकलेचे शस्त्र तेवढे मनुष्याजवळ जास्त, तेही बाह्य साधनाभावी प्रसंगी अत्यंत पंगू ठरते. अशा पंगू व दुबळया स्थितीत प्राचीन ऋषिपूर्वजांत मृत्युसंख्या किती भयंकर असेल तिची कल्पनाच करावी. अरण्यातील वानरांची वाढ ज्या अल्प प्रमाणावर होत असलेली आपण पाहतो तेच किंवा त्याहूनही अल्पतर प्रमाण पाशवावस्था माणसाच्या लोकसंख्येच्या वाढीचे असे. यूथातील लोकसंख्या जेमतेम आहे तितकी टिकली म्हणजे महद्भाग्य. मनुष्याची अशी किरकोळ संख्यावृद्धीची किती हजार वर्षे गेली असतील ते सांगवत नाही. कालांतराने हजारो टक्केटोणपे खाऊन व लाखो अवलोकनें करून व करोडो वेळा फसवून मनुष्याच्या, म्हणजे सर्वच मनुष्यांच्या नव्हे तर वैदिक ऋषि ज्यांच्यापासून जन्मले त्या पाशवप्राय ऋषिपूर्वजांच्या, उष्णकाली अरण्यात सहज पेटणाऱ्या दावाग्नीने दग्ध झालेल्या वनस्पतींच्या निखाऱ्यांची धग सहन न होऊन कृमिकीटक व गजव्याघ्र जीव घेऊन पळतात, ही बाब लक्षात आली व तिचा अनुभव घेऊन पाहण्याची कित्येक कल्पक ऋषिपूर्वजांना सुदैवाने बुद्धी झाली. रानातील जळकी कोलिते हत्ती, वाघ, सिंह, हरणे इत्यादींच्या अंगावर फेकिली असता, ती श्वापदे मनुष्याच्या वाऱ्याला उभी रहात नाहीत, हा अनुभव ऋषिपूर्वजांनी प्रथम मिळविला. स्वसंरक्षणार्थ व शत्रुनिर्दालनार्थ कोलितांचा उपयोग करण्याचा शोध लागल्या दिवसापासून, पशुप्राय ऋषिपूर्वजांची उत्तरोत्तर आस्ते आस्ते संस्कृतीत प्रगती होत गेली. दावाग्नीने भडकणाऱ्या रानांचे उल्लेख ऋग्वेदात आढळतात. जळून पोळून राखरांगोळी करणाऱ्या व मागे सर्व रान काळेकुट्ट करून टाकणाऱ्या अग्नीला कृष्णवर्मा हे उपपद ऋग्वेदात बहुत स्थली दिलेले आहे. कोलितांचा उर्फ कुलिशांचा उर्फ जळक्या कोळशांचा श्वापदांना भेवडविण्याच्या कामी उपयोग करण्याची क्लृप्ती यद्यपि वनचर ऋषिपूर्वजांना गावली तत्रापि त्या क्लृप्तीचा उपयोग उन्हाळयात रानांना वणवा लागेल तेव्हाच तेवढा करता येण्याजोगा असे. आयती कोलिते मिळण्याचे असले सुप्रसंग फारच क्वचित् व फार झाले तर दोन अडीच महिने मिळण्याचा संभव असल्यामुळे वर्षाच्या बाकीच्या दहा महिन्यांत ऋषिपूर्वज इतर पशूंइतकेच दुबळे असत. ह्या दुबळेपणात शेकडो वर्षे काढल्यावर, वणव्याने पेटलेले ओडंके डोंगरातील गुहांतून जळके राखून ठेवण्याची क्लृप्ती सुचली. ह्याच क्लृप्तीला अनुलक्षून ऋग्वेदात गुहाहितः, गुहायां निहितः ही विशेषणे अग्नीला लावलेली आहेत. गुहाहित म्हणजे गुहांत राखून ठेवलेला अग्नी, डोंगरकपारीतील गुहेच्या बाहेर मैदानात किंवा नदीतीरी किंवा इतरत्र हवा तेथे वाटेल तेव्हा वाटेल त्या ऋतूत उपयोगास आणता येत असे. हीही अडचण अकलेच्या जोरावर रानटी ऋषिपूर्वजांनी कालांतराने काढून टाकली. ऋषिपूर्वजांचा अत्यंत पहिला पूर्वज कोणी अंगिरस या नावाचा पुरूष होऊन गेला. त्याने गुहेत जतन करून ठेवलेल्या अग्नीस गुहेच्या बाहेर आणून लोकांत आणून सोडले म्हणून ऋग्वेदात अनेकदा उल्लेख आलेले आहेत. ते ऋग्वेद वाचणाऱ्यात इतके प्रसिद्ध आहेत की, त्यांचे संदर्भ देऊन कालहरण करीत नाही. जेव्हा ऋषिपूर्वज गुहांतून म्हणजे डोंगरातील भुयारातून वसती करून असत व खाली मैदानातून झोपड्या करून राहण्याची कला त्यांच्यात निर्माण झाली नव्हती, तेव्हा सतत उपयोगी पडावा म्हणून ते अग्नीचे रक्षण सहजच गुहातून करीत. पुढे झोपड्यातून राहण्याची कला माहीत झाल्यावर गुहेत अग्नी न ठेविता, ते तो झोपड्यातून ठेवू लागले. ही झोपड्यातून अग्नि ठेवण्याची क्लृप्ती समाजात प्रथम

अंगिरसाने काढिली. गुहेत जोपर्यंत अग्नी ठेविला जात असे, तोपर्यंत शत्रूंवर फेकण्यासाठी कोलिते आणण्यास वारंवार गुहेकडे जावे लागे आणि प्रसंगी गुहेतील अग्नी वेळेवर हाती येण्यापूर्वी हिंस्त्र पशू व त्याहून हिंस्त्र असे जे दस्यू ते ऋषिपूर्वजांना इजा करून निघून जात. झोपड्यातून अग्नी ठेवण्याची जेव्हा क्लृप्ती निघाली, तेव्हा शत्रूला वाटेल तेव्हा तोंड देण्याचे सामर्थ्य ऋषिपूर्वजांत आले. ह्यापूर्वी शत्रूंवर अग्नीचा उपयोग इतर श्रेष्ठ लोकांनी केलेला ऋषिपूर्वजांनी पाहीलेला होता. रानटी ऋषींहून जास्त सुधारलेले देव म्हणून कोणी लोक असत. यथा वै मनुष्या एवं देवा अग्र आसन् ( तै.सं.का. ७ प्र. - ४ – अनुवाक २ ). ते दस्यूंचा पाडाव आग टाकून करीत. अयं अग्नि: पृतनाषाट् सुवीरो येन देवासो असहन्त दस्यून् ( ऋग्वेद सूक्त २६३ नववी ऋचा ). हा अग्नी दस्यूंची सैन्ये मारून काढितो, याच्या साहाय्याने देवांनी दस्यूंचा पुरातन काली पाडाव केला, असे वर्णन वैदिक ऋषींनी केलेले आहे. शत्रूंच्या अंगावर देव आग पाखडीत त्यांना पिटाळून लावीत हे रानटी ऋषिपूर्वज शेकडो वर्ष पाहत होते; परंतु ही आग ते कशी निर्माण करीत व कोठून आणीत ते ऋषिपूर्वजांना कळत नसे. देवांनीही रानटी ऋषिपूर्वजांना अग्नी उत्पन्न करण्याचे गुह्य आपणहोऊन परोपकारबुद्धीने कधई सांगितले नाही, सांगितले असते तर देवांचा श्रेष्ठपणा राहिला नसता. कदाचित् देवांनी मानवांना ते गुह्य सांगण्याचा प्रयत्न केला असता, तरी ते रानटी माणसांना कळले असते की काय याचा संशय आहे. उदाहरणार्थ. सध्याचा गनकॉटन घ्या. सध्याचा युरोपियन माणूस गनकॉटन निर्माण करू शकतो व त्याच्या जोरावर कमेत्तर सुधारलेल्या लोकांचा पाडाव करतो. अरब, अफगाण, हिंदू, चिनी हे लोक युरोपियन माणसाचा हा प्रभाव पाहतात, परंतु गनकॉटन तयार कसा करावा हे या लोकांना माहीत नसते. यद्यपि परोपकारबुद्धीने युरोपियन माणसाने गनकॉटन कसा तयार करतात याची माहिती रानटी हिंदू, मुसलमान किंवा चिनी माणसाला दिली, तत्रापि हिंदू वगैरे कमतर सुधारलेल्या लोकांना गनकॉटन तयार करता येणे निखालस अशक्य असते; कारण गनकॉटन नावाचा अग्नि निर्माण करण्याला जे शास्त्रीय ज्ञान व शास्त्रीय अवजारे व हत्यारे व औते लागतात त्याचे स्वप्नही हिंदू, अरब, अफगाण वगैरेंच्या सध्याच्या रानटी द्विपादांना नसते. अर्थात्, गनकॉटन करण्याचे गुह्य यद्यपि व्याख्यानांनी, पुस्तकांनी किंवा साक्षात् कारखान्यातून पढवून या लोकांना सांगितले तथापि तो स्वदेशात स्वतंत्रपणे तयार करण्याची ऐपत या लोकांना नसते. तोच प्रकार रानटी ऋषिपूर्वजांचा असे. देव शत्रूवर आग पाखडीत व त्यांचा पराभव करीत हे ऋषिपूर्वज पहात, परंतु ही आग कशी तयार करावी, अग्नी वेळ पडेल तेव्हा कसा उत्पन्न करावा, कोणती इंधने उपयोगात आणावी वगैरे वनस्पतिज्ञान, पुढील तजवीज अगाऊ करून ठेवण्याची नौतिक बुद्धी ज्वालाग्राही इंधनाचा साठा करण्यास लागणारी निवा-याची घरे, वगैरे पूर्वतयारी रानटी ऋषिपूर्वजांजवळ नसल्यामुळे, देवांच्या क्लृप्त्या माणसांना पेलता येण्यासारख्या नव्हत्या. पुढे वन्य ऋषिपूर्वज गुहा सोडून झोपड्या करून जेव्हा राहण्याच्या पायरीला आले, जळाऊ इंधने कोणती हे अनुभवजन्य शास्त्रज्ञान जेव्हा त्यांना त्यांच्या स्वत:च्या मेहनतीने आले, आणि पुढील संकटांना तोंड देण्याकरिता अगाऊ जय्यत तयारी करून असावे लागते, हे नीतिज्ञान जेव्हा त्यांनी संपादन केले, तेव्हा अगीचे स्वामित्व ऋषिपूर्वजांना येऊन, त्यांची सुधारणेच्या कामात उत्तरोत्तर प्रगती होत गेली. अगदी प्रथम ऋषिपूर्वज अग्नी कसा तयार करीत त्याचे दिग्दर्शन ऋग्वेदात केलेले सापडते. अग्नी हा दहा बहिणींचा पुत्र होय, अशी कव्योक्ती आहे. दश स्वसारो अग्रुव : समीची: पुमांसं जातमभि संरभंते ( ऋग्वेदसूक्त २६३ ऋचा १३ ). हाताच्या अंगुळया ह्याच कोणी ज्या दहा बहिणी, त्यांना त्यांच्या स्वत:च्या मेहनतीने जेव्हा पुत्र झाला तेव्हा अत्यानंद झाला. दोन शीघ्र ज्वालाग्राही लाकडाच्या काटक्या घेऊन व त्या दोन्ही हातांच्या बोटांनी खालीवर घासून ऋषिपूर्वज इतर आधुनिक रानटी लोकांप्रमाणे अग्नी उत्पन्न करीत, या क्लृप्तीचे वर्ण वरील ऋचेत आलेले आहे. ह्या ज्वालाग्राही लाकडाच्या काटक्यांना रानटी ऋषिपूर्वज समिध् ओषधी इत्यादी नावे देत समिध् म्हणजे चांगली जळणारी काटकी व ओषधी म्हणजे उष्णता धारण करणारी काटकी. टणक ज्वालाग्राही काटक्या एकमेकांवर घासून यद्यपि वाटेल तेव्हा अग्नी निर्माण करता येत असे, तथापि अचानक हिंस्त्र पशूंचा किंवा दस्यूंचा घाला आला असता, त्याचा उपयोग व्हावयाला विलंब लागे व इजा व्हावयाची ती होऊन जाई. ही अडचण टाळण्याकरिता कित्येक ऋषिपूर्वजांनी झोपड्यांच्या आत किंवा जवळ लहानमोठया खाचा खणून त्यात लाकडाचे ओंडके व झाडांची सबंध खोडे सतत जळत ठेवण्याची युक्ती काढली. या खाचांना ते कुंडे म्हणत, कुंडात धगधगीत निखारे साही ऋतूंत रात्रंदिवस तयार असत. त्यांच्या साह्याने आर्यपूर्वज येईल त्या दस्यूचा किंवा पशूंचा नि:पात करीत. येणेप्रमाणे कुंडातील अग्नी हे एक ऋषिपूर्वजांना जवळ अप्रतिहत हत्यार बनून गेले. ह्या हत्याराला ऋषिपूर्वज कधीही व कोठेही विसरत नसत; कारण ह्या हत्यारावर त्यांच्या मालमत्तेच्या व जिवाच्या सुरक्षिततेची सारी मदार अवलंबून असे. भयंकर अशा निबिड महारण्यात जावयाचे असो किंवा विस्तीर्ण नद्या-होड्यातून पार व्हावयाचे असो, ऋषिपूर्वज बरोबर अग्नी

घेतल्याशिवाय झोपड्याबाहेर एक पाऊलही टाकीत नसत. अरण्यात एकटे राहण्याचा प्रसंग आल्यास, बरोबरच्या अग्नीने एखादे वाळलेले खोड, किंवा बुंधा पेटवून त्याच्या शेजारी अशन, प्राशन, शयन व आसन ऋषिपूर्वज निर्धास्तपणे करीत आणि सिंह, हत्ती, वाघ किंवा लांडगा हिंस्त्रबुद्धीने जवळ आल्यास आगीतील कोलिते किंवा जळजळीत निखारे त्यांच्या अंगावर टाकून त्यांना पळवून लावीत किंवा ठारही करीत. अद्यापही हा परिपाठ हिंदुस्थानात जिवंत दृष्टीस पडतो. बैरागी नावाचे जे नाना जातीय तपस्वी हिंदुस्थानात ठिकठिकाणी अरण्यातून व ओसाड प्रदेशातून हंगामी वस्ती करून राहतात, ते उतरण्याची जागा पसंत केल्याबरोबर पहिले काम जे करतात ते अग्न्यावाहनाचे. म्हणजे धुनी पेटवून तीत आपले त्रिशूळ उलटे करून ठेवतात. आणि कोणत्याही व कसल्याही श्वापदाची क्षिती बाळगीत नाहीत; कारण त्रिशूळाच्या लाल इंगळासारख्या टोकांनी धिटाईने जवळ येणाऱ्या व्याघ्रादींना भाजून काढण्याचे सामर्थ्य आपल्याजवळ जय्यत तयार आहे अशी त्यांना खात्री असते. अर्वाचीन बैराग्याजवळ असे लोखंडी त्रिशूळ असतात तसे रानटी आर्य पूर्वजांजवळ नसत, कारण खाणीतून लोखंड काढण्याची कला अद्याप त्या वनचरांना अवगत झाली नव्हती. लोखंड व पोलाद माहीत नसल्यामुळे चकमकीचा शोधही अत्यंत प्राथमिक आर्यपूर्वजांना लागला नव्हता. आर्यांच्या सबंध यज्ञप्रक्रियेत म्हणजे यजुसंहितेत चकमकीपासून अग्नी सिद्ध करण्याचे अवाक्षरही नाही. लाकडाच्या अरण्याचा, समिधांचा व शेणकुटाचा उल्लेख वारंवार केलेला आढळतो, परंतु लोखंड व गार यांनी बनलेली जी चकमक तिने अग्नी सिद्ध करण्याचा उपदेश कोठेही केलेला नाही. याचा अर्थ इतकाच की आर्य वनचर अद्याप लोहयुगात येण्यास बराच अवकाश होता, फक्त ज्वालाग्राही लाकडे घर्षणाने पेटवून अग्नी सिद्ध करण्याची कला त्यांना नुकती कोठे सापडली. या युगाला दारूयुग म्हतले असता वावगे होणार नाही. चुडा व उल्का पेटवून रात्री उजेड करण्याचेही ह्या काली त्यांना ज्ञान झाले होते. उल्का उर्फ चुडांच्या उजेडाने शत्रूंनी गुहांतून लपवून ठेविलेल्या गाई शोधून काढिल्याचे उल्लेख ऋग्वेदात येतात.

(१) तपूंष्यग्ने जुह्वा पतंगानसंदितो विसृज विष्वगुल्का: ( ऋग्वेद ३०० २ )
(२) अस्माकमत्र पितरो मनुष्या अभि प्रसेदुरऋतमाशुषाणा: ।
अश्मवज्रा: सुदुधा वव्रे अंत रूदुस्रा आजन्नुषसो हुबाना : ॥ १३ ॥
(३) ते मर्मृजत ददृवांसो अद्रिं तदेषामन्ये अमितो विवोचन् ।
पश्वयंत्रासो अभि कारमर्चन् विदंत ज्योति श्वकृपंत धीभि: ॥ १४ ॥ ( ऋग्वेद सूक्त २९७ )

ह्या तीन ऋचातील (१) उल्का, (२) अश्मव्रजा: व (३) विदंत ज्योति: ही तीन शब्दस्थाने प्रकृतार्थाला उपयुक्त आहेत. पणि नावाच्या शत्रूंनी अंगिरसाच्या अश्मव्रज गाई चोरून नेऊन डोंगराच्या गह्वरात दडवून ठेविल्या. त्या गाईंना अग्नीच्या ज्योतीच्या उजेडाने अंगिरसांनी शोधून काढिले, असा दुस-या व तिस-या ऋचात मजकूर सांगितला आहे. अग्निं अर्चयन्त: ज्योति: अविदन् म्हणजे अग्नीची सिद्धता करून अंगिरसांनी ज्योत तयार केली, आणि अंधारातील गाई त्या ज्योतीच्या उजेडाने शोधून काढिल्या. येथे ज्योत म्हणजे चूड, चुडेचा उजेड असा अर्थ घेणे युक्त दिसते. पहिल्या ऋचेत उल्का म्हणजे चूड, कोलीत हा शब्द तर साक्षात् आलेला आहे. तात्पर्य, चूड पेटवून उजेड पाडण्याची कला ऋषिपूर्वजांना माहीत झालेली होती. तसेच मोठमोठया दगडांची आवारे करून त्यांत गाई वगैरे मालमत्ता ठेविण्याचाही प्रघात ऋषिपूर्वजांत असे. वरील ऋचांत अश्मव्रजा: हे उस्त्रांचे म्हणजे गाईचे विशेषण आहे. व्रज म्हणजे गोठा, अश्मव्रज म्हणजे दगडांचा गोठा. मोठमोठे हत्तीसारखे दगड सभोवार रांगेने रचून ऋषिपूर्वज गाईंना निवाऱ्याची जागा तयार करीत. त्या जागांना उर्फ गोठयांना ते अश्मव्रज म्हणत. अस्मव्रजा म्हणजे इतर देशांत स्टोनहेंज म्हणून ज्यांना म्हणतात ते. येणेप्रमाणे झोपड्या, अश्मव्रज, अग्नी व गाई ह्या चार वस्तू तत्कालीन ऋषिपूर्वजांच्या संस्कृतीची मुख्य चिन्हे असत. अग्नी चाहेल त्या वेळेस मिळावा म्हणून कुंडातून सतत धुमत ठेविलेला असे. अग्निकुंडाच्या भोवतालील जागा गाईच्या शेणाने सारवून वसण्याउठण्यास सोईस्कर अशा केलेल्या असत. दिवसा उपजीविकेची कामेधामे करून रात्री ह्या अग्निकुंडाच्या भोवती ऋषिपूर्वज उबाऱ्याला बसत आणि शिळोप्याच्या करमणुकी करत किंवा मद्यमासांची सिद्धता करीत. सोमवल्लीची दारू व गाईबैलांचे किंवा इतर श्वापदांचे मांस या अग्निकुंडाच्या सान्निध्याने व साहाय्याने निष्पन्न करीत. नंतर मद्यमासांवर यथेच्छ हात मारून, निरनिराळया छंदांतली गाणी म्हणून ते एकमेकांना रिझवीत किंवा आपल्या इष्ट देवतेची करूणा भाकीत. ह्या काली ऋषिपूर्वजांचा मोठा आवडता देव म्हटला म्हणजे महदुपयोगी जो अग्नी तो असे. अग्नीच्या साह्याने उघड्या मैदानात झोपड्या करून सुखाने राहता येऊ लागले,

अग्नीच्या साह्याने सुग्रास पाकनिष्पत्ती करिता येऊ लागली. अग्नीच्या साह्याने हिंस्त्र पशू व दुष्ट शत्रू यांचा प्रतिकार करता येऊ लागला, अग्नीच्या योगाने दाट जंगलाची चरती कुरणे करता आली, सबब अग्नी ह्या अजब व अतर्क्य वस्तूवर आर्यपूर्वजांचे निरतिशय प्रेम उर्फ भक्ती बसली आणि अग्नी हा सुखकर्ता, दु:खहर्ता व विघ्ननिवारिता असा भासू लागला. अग्नी ह्या सर्वतोपरी अत्यंत उपयुक्त वस्तूवर आर्यपूर्वजांची इतकी भक्ती बसली की खाणे, खेळणे, बसणे, उठणे, निजणे व प्रजोत्पादन करणे ते सर्व अग्नीच्या साक्षीने ते करू लागले. हे शेवटले व अत्यंत महत्वाचे जे प्रजोत्पादनाचे कर्म ते अग्निकुंडाभोवताली उबाऱ्याच्या भूमीवर आर्यपूर्वज उरकीत, हे विधान अत्यंत महत्वाचे आहे; कारण, यज्ञ म्हणून जी संस्था आर्यपूर्वजांत पुढे उदयास आली तिचा उगम अग्नीकुंडाभोवती प्रजोत्पादनाचे जे कार्य चाले त्याच्याशी संबद्ध आहे. अग्नीपाशी ऋषिपूर्वज वारंवार आग्रहाने काय मागतात ते ऋग्वेदाच्या पाचव्या व सहाव्या मंडळातील चाळता चाळता सहज आढळणाऱ्या काही वाक्यांचे अवतरण करून दाखवितो.

(१) स्यान्न: सू नु स्तनयो विजावा
(२) शग्धि वाजस्य सुभग प्रजावत:
(३) अयं अग्नि: सुवीर्ये स्येशे
(४) अग्ने तोकं तनयं वाजि नो दा:
(५) गो माँ अग्ने ऽ विमाँ अश्वी यज्ञो
नृवत्सखा सदमिदप्रमृष्य:
इळावाँ इषो असुर प्रजावान् ।
दीर्घो रयि: पृथुबुघ्न: सभावान् ॥
(६) त्वदेति द्रविणं वीरपेशा: ।

या सहाही वाक्यांत अग्नीने उपासकांस प्रजा द्यावी, पुत्र द्यावे, वीरसंतती द्यावी अशी प्रार्थना केली आहे. पाचव्या वाक्यात तर आमचा हा यज्ञ प्रजावान होवो, अशी उत्कंठा दर्शविली आहे. प्रजा किंवा पुत्र दोन प्रकारचे असत. (१) पुंस्पुत्र व (२) स्त्रीपुत्र. पुत्र ह्या पुल्लिंगी शब्दाने मुली व मुलगे ह्या दोन्हींचा बोध ऋषिपूर्वजांच्या भाषेत होई. अग्नी प्रजा कशी देई, व यज्ञ पुत्रवान् व प्रजावान् कसा होई ही पृच्छा तृप्त व्हावयाची म्हणजे ऋषिपूर्वजांच्या समाजात पुरातनकाली जी एक चाल प्रचलित असे तिचे वर्णन करणे जरूर आहे. ऋषीपूर्वज थंड हवेच्या प्रदेशात राहत असत. दिवसा श्रमसाहस व स्वारी-शिकार केल्यावर उबाऱ्याकरिता धगधगीत धुमीच्याभोवती येऊन बसत आणि तेथे ते पाशवावस्थ स्त्रीपुरूष ऋषिपूर्वज यभनक्रिया करीत. या विधानाला पोषक असे कृष्णयजुर्वेदातील व शुक्लयजुर्वेदातील साक्षात् काही मंत्र देतो व काही मंत्राचे तात्पर्य देतो. यजुर्वेदातीलच मंत्रावतरण करण्याचे कारण असे की ह्या वेदाचा मुख्य विषय त्याच्या नावाप्रमाणे युजस् म्हणजे यज्ञ हा आहे. यजुर्वेदात अग्नी चेतवून यज्ञ कसे करावे, कां करावे व यज्ञाची फलनिष्पत्ती काय, ह्या तीन बाबींचे ख्यापन केलेले आहे, व प्राधान्येकरून अग्नीचे स्तोम गायिलेले आहे.

(३) ऋषींच्या अंगिरस नावाच्या प्राचीन पूर्वजाने गुहेतून अग्नी मैदानातील झोपड्यात आणिला इत्यादी वर्णन मागील कलमात केले आहे. झोपड्यात अग्नी आल्यापासून ते जीवनयात्रेची साधने वृद्धींगत होऊन सहजच पूर्वी जितकी होणे मुष्कील होते, तीहून जास्त प्रजावृद्धी होऊ लागली, यामुळे अंगिरसाला प्रजापति हे अभिधान सार्थ मिळाले. अग्निसिद्धीचा शोध व प्रजापतिसंस्था स्थापन ही दोन्ही समकालीन झाली. झोपड्यांत अग्नी सिद्ध करता येऊ लागल्यानंतर थोड्या अवधीने प्रजापतिसंस्था स्थापन झाली, अनेक स्त्रिया व एक प्रजापति असा तत्कालीन समाज असे. स्त्रियांच्या पोटी झालेल्या सर्व प्रजेचा मालक यूथाचा वृषभ म्हणजे रेत:सिंचन करणारा जो प्रजाप्ती तो असे. अनेक प्रजापती ऋषिपूर्वजांच्या समाजात निर्माण झाले. प्रजापती यूथातील स्त्रियांशी समागम अग्निकुंडाच्या समीप करी. त्या काली गाद्यागिर्द्या वगैरे संपन्न साधने आंथरापांघरावया नसत. रानटी आर्यपूर्वज बर्हि नावाचे तृण अग्निकुंडाभोवती पसरून त्याच्यावर शयन व अभिमेथन करीत. तैत्तिरीयसंहितेच्या प्रथम कांडाच्या सातव्या प्रपाठकाच्या चौथ्या अनुवादात खालील वाक्य आले आहे : "बर्हिषा वै प्रजापति: प्रजा असृजत ।" या वाक्याचा खरा वाच्यार्थ असा आहे की, बर्हिस नामक गवत आंथरून त्याजवर प्रजापतीने प्रजा उत्पन्न केल्या. रानटी ऋषिपूर्वज बर्हिचा बिछाना करीत, सबब प्राचीन रूढी म्हणून ती पूज्य होऊन बसली व तिचे वर्णन यजुर्वेदकालीन यज्ञकर्ते ऋषी पूज्यभावाने करू लागले. बर्हिच्या देवयज्येने प्रजापती प्रजावान् झाला, या विधानाचा अर्थ यजुर्वेदकालीन ऋषींना समजेनासा झालेला होता. काही अतर्क्य दैवी रितीने बर्हि घेऊन प्रजापती प्रजा उत्पादन करीत, असा

अर्थ यजुर्वेदकालीन ऋषी समजत, परंतु खरा अर्थ आम्ही वर जो सांगितला तो आहे. बर्हि आंथरून रानटी ऋषीपूर्वज त्यांचा बिछानावजा उपयोग करीत. उत्तानार्थ हाच अर्थ आहे. याला याच अनुवाकात एक प्रमाण आहे. या अनुवाकात पुढे खालील वाक्य आले आहे. सोमस्याहं देवयज्यया सुरेतो रेतो धिषीय इत्याह सोमो वै रेतोधा: तेनैव तेर आत्मन्धते । सोमाच्या देवयज्येने प्रभूतरेतस् होऊन रेत धारण करीन असे यजमान म्हणतो, कां की सोम रेत उत्पन्न करणारा आहे. त्या सोमरसाने यजमानाच्या ठायी रेत साठते. येथे उत्तानार्थ असा आहे की सोमनामक मादक रस प्राशन केला असता माद येऊन रतिक्रिया मनसोक्त होत असे. सबब प्राचीन ऋषिपूर्वज तो सोमरस यथेच्छ पीत व त्याच्या अमलात मनमुराद निर्भयपणे स्त्रीसमागम करीत. सोमरसाचा हा जो माद आणून यथेच्छ रतिकर्म संपादण्यास समर्थ करण्याचा गुण सोम या देवतेचा आहे असा यजुर्वेदकालीन ऋषीचा समज होता. असाच समज बर्हिसंबंधाने त्या ऋषींचा होता. रानटी ऋषीपूर्वज आगटी व धुमी पेटविताना पेटविल्यावर काटक्या, समिधा, डावल्या, गवत, मद्य इत्यादी ज्या ज्या साधनांचा उपयोग करीत, ती ती सर्व साधने त्या रानटी ऋषीचे वंशज जे ऋक्कालीन व यजुकालीन ऋषी त्यांना देवतारूप वाटत. रानटी साधनांच्या साहाय्याने रानटी पूर्वजांनी घरे, दारे, संपत्ती, गाई, गुरे व विशेषत: प्रजा संपादन केल्या. त्या रानटी साधनांचा रानटी पूर्वज जो सहज उपयोग करीत त्या उपयोगाची नक्कल यज्ञ करणारे यजु:कालीन ऋषी हुबेहूब उठवून देत, आणि ती नक्कल बिनचूक केली म्हणजे फलप्राप्ती हटकून होईल अशी आशा बाळगीत. रानटी पूर्वज लाकडांवर लाकडे घासून अग्नी उत्पादन करीत म्हणून त्या रानटी पूर्वाजांचे सुधारलेले वंशजही लाकडावर लाकडे घासून यज्ञार्थ अग्नी संपादन करण्याची नक्कल उठवून देत. सुधारलेल्या वेदरचनाकालीन ऋषींना गोवऱ्या, चकमकी इत्यादी साधने उपलब्ध असत, परंतु त्या नव्या साधनांनी अग्नी भरदिशी न निष्पादिता, ते भोळया श्रद्धेने पूर्वजांनी ज्याप्रमाणे लाकडे घासून अग्नी सिद्ध केला त्याप्रमाणे अग्नी सिद्ध करीत. हेतु असा की, पूर्वाजांना जी फलप्राप्ती ज्या प्रक्रियेने झाली ती फलप्राप्ती त्या प्रक्रियेवाचून होणार नाही. येथून तेथून सर्व यजु:संहिता रानटी पूर्वजांच्या कृतीची नक्कल कशी करावी या एका बाबीने भरली आहे. अमुक कार्य करताना किंवा अमुक सामग्री मिळविताना पूर्वजांनी जागती किंवा शक्करी छंद म्हटला, सबब ते कार्य किंवा ती सामग्री मिळविण्याची कामना असल्यास जागती किंवा शक्क्वरी छंदच म्हटला पाहिजे, नाहीतर कार्य बिघडेल. असे इशारे यजु:संहितेत जागजागी दिलेले आहेत. तात्पर्य, रानटी पूर्वजांची नक्कल अणुरेणुचीही चूक न होता उठली तरच इष्टकामना परिपूर्ण होईल अशी यजु:कालीन याजकाची समजूत असे. प्रस्तुत कलमातील विवेचन रानटी पूर्वजांच्या प्रजोत्पादनसंबंधाचे आहे, करिता रानटी पूर्वाजांच्या प्रजोत्पादनक्रियेची नक्कल यजु:कालीन ऋषी कशी हुबेहूब करीत त्याचा एक मासला देतो. प्रथमारंभी रानटी ऋषिपूर्वज बहुतेक पशूंसारखे उघडे नागडे असत, पशुपक्षी ज्याप्रमाणे रतिकर्म उघड्यात किंवा झाडाझुडपांवर उरकतात त्याप्रमाणे हे पाशवावस्थ ऋषिपूर्वजही रतिकर्म उघड्यात किंवा झाडाझुडपांवर उरकीत. लिंगाला किंवा योनीला हात लावणे, अभद्र शब्द उच्चारणे इत्यादी अर्वाचीन दृष्टीला दिसणारे गलिच्छ प्रकार ह्या पशुतुल्य लोकांत असत. नंतर सुधारणा होऊन लोकांना अग्नी तयार करता येऊ लागला, तेव्हा अग्नीभोवती हे रानटी लोक रतिकर्म संपादित. वाटेल त्या स्त्रीला वाटेल त्या पुरूषाने रत्यर्थ धरून न्यावे हा त्या काली धर्म समजला जात असे. ज्या स्त्रीला कोणी धरून न नेई ती स्त्री हिरमुसली होई व रडे की आपणास कोणी धरून नेत नाही किंवा रतिसुख देत नाही. अशा स्त्रीस पश्चादीशी अभिगमन करण्याची मोकळीक असे. अशी ही स्त्रीपुरूषसमागमाची पद्धती रानटी ऋषिपूर्वजांत असे. ह्या पद्धतीची नक्कल रानटी ऋषींचे सुधारलेले यजु:कालीन वंशज येणेप्रमाणे करीत. अश्वमेध नावाचा एक यज्ञ असे. या यज्ञाची प्रक्रिया, फलश्रुती व दंतकथा यजु:संहितेत दिल्या आहेत, पैकी सातव्या कांडाच्या चौथ्या प्रपाठकाच्या एकोणिसाव्या अनुवाकात राजपत्न्यांचा विलाप दिला आहे. शुक्लयजु:संहितेत हाच विलाप तेविसाव्या अध्यायाय दिला आहे. ह्या अनुवाकाला भाष्यकार विलाप म्हणतो, परंतु याला विलास हे नाव उत्तम शोभेल. ह्या विलासात्मक प्रकरणाचे कृष्ण व शुक्ल संहितात कित्येक पाठ इतके भिन्न आहेत की त्यावरून एक निश्चित अनुमान करता येते, ते असे :- दोन्ही संहिता जेव्हा रचिल्या गेल्या तेव्हा खरे मूळ पाठ कोणते ते संहिताकारांनाही निश्चयात्मक माहीत नव्हते. उदाहरणार्थ, कृष्णयजु:संहिताकार गृह असा पाठ देतो व शुक्लयजु:संहिताकार गुद असा पाठ देतो. प्राचीन रानटी ऋषिपूर्वजांचा खरा मूळ पाठ काय होता तो दोन्ही संहिताकारांना माहीत नव्हता. निजल्गुलिति व निगल्ग्लीति, प्रसुलामि व प्रतिलामि इत्यादी पाठांतरांनाही हाच न्याय लागू आहे. तात्पर्य; ह्या प्रकरणात पूर्वपरंपरागत जी वाक्ये दिली आहेत ती अगदी अपभ्रष्ट होऊन गेलेली आहेत. यावरून असे अनुमान बांधता येते की, यजु:संहितेचे कृष्ण व शुक्ल असे पाठ जेव्हा रचिले गेले तेव्हा ही पूर्वपरंपरागत वाक्ये इतकी जुनाट व भ्रष्ट होऊन गेली होती की संहिताकारांना खरे पाठ कोणते ते ठरविता येईना. सबब जसे लोकांच्या

तोंडून त्यांनी पाठ ऐकिले तसेच्या तसेच भ्रष्ट व अर्थहीन पाठ देणे त्यांना भाग पडले. उवट व सायण यांना तर ह्या प्रकरणातील बरेच शब्द व वाक्ये कळली नाहीत. इतकेच नव्हे तर प्राचीन समाजाच्या चालीरीतींचे ज्ञान नसल्यामुळे वाक्याचे भलतेच अर्थ त्यांनी लिहून ठेविले आहेत. उदाहरणार्थ, माता च ते पिता च ते अग्रं वृक्षस्य रोहत: या वाक्यातील वृक्ष या शब्दाचा अर्थ उवट मंचक असा करतो व सायण तल्प असा करतो. उवटकाळी व सायणकाळी स्त्रीपुरूषसमागम मंचकावर किंवा तल्पावर होत असे, सबब वृक्ष म्हणजे मंचक किंवा तल्प असा अर्थ त्यांनी केला ते रास्तच आहे. पाशवावस्थेतील वनचर मनुष्य वानरादी इतर पशुपक्ष्यांप्रमाणे प्रशस्त वृक्षांच्या शाखांवर समागम करीत ही कल्पना जर त्यांना अवगत असती, तर त्यांनी वृक्ष या शब्दाचा वाच्यार्थच घेतला असता, यात संशय नाही. असो. प्रकृत स्थल शब्दविषयक किंवा वाक्यविषयक विवेचन करण्याचे नव्हे. शब्द वाक्यविषयक जी थोडीशी टीका येथे केली ती एवढ्याच करिता की, शुक्ल व कृष्ण यजु:संहितांच्या या प्रकरणांतील चालीरीती अत्यंत प्राचीनतम आहेत हे उत्कटत्वाने भासमान व्हावे. या प्राचीनतम चालीरीतींची नक्कल अश्वमेध यज्ञात यजु:संहितारचनाकालीन व तदुत्तरकालीन याजक व यजमान संभावितपणे करीत असत. व त्या अश्लील नकलेला कोणी नावे ठेवीत नसत. नक्कल जशीची तशी वठली पाहिजे नाही तर इष्टफलप्राप्ती चुकेल, असा सर्व समाजाचा समज असे. आता नकलेचा तपशील दोन्ही संहितात जसा दिला आहे तसाचा तसाच इथे मराठीत पूर्वापरसंबंध दाखविणारी वाक्ये घालून नमूद करतो. प्रथम कृष्णयजु:संहितेतील पाठ घेतो.

(४) साम्राज्य, राष्ट्र, संपत्ती व वीर्यशाली प्रजा प्राप्त व्हावी एतदर्थ अश्वमेध यज्ञ करण्याचा प्रघात असे. यज्ञात स्त्रीपुरुष असा सर्व प्रकारचा समाज जमे. अध्वर्यु, उद्गातृ, होता असे ऋत्विज पुरूष असत व महिषी, यजमान-पत्नी इत्यादी स्त्रिया असत. पैकी वीर्यशाली प्रजा उत्पन्न व्हावी या कामनेच्या सिद्ध्यर्थ खालील नाटक केले जात असे. अश्वमेधातील घोडा मृत होऊन पडल्यावर तेथे राजपत्न्यांना बोलावून आणीत. राजपत्न्यांपैकी मुख्य जी पट्टराणी ती आपल्या आईला किंवा सपत्न्यांना उद्देशून म्हणे की, बायांनो, हा मेला घोडाच माझ्याशी निजेल; कारण, मला अभिगमनार्थ दुसरा कोणीच की गे नेत नाही. पट्टराणीची ही तक्रार ऐकून, घोडा खडखडून जागा होतो व पट्टराणीला म्हणतो, ये, येथे हे क्षौमवस्त्र म्हणजे सोवळयाचे वस्त्र अंगावर घेऊन आपण निजू. त्याला रूकार देऊन पट्टराणी म्हणते, मी तुजपाशी गर्भधारणार्थ आले, तूही मजकडे गर्भ पेरण्यास ये, आपण पाय पसरून निजू. घोडा आणि पट्टराणी ही एकमेकांशेजारी पडल्यावर प्रतिप्रस्थाता म्हणतो की, हा घोडा रेत:सिंचन करो व तुझी योनी रेतोधारण करो. असा मंत्र म्हणून, ऋत्विज घोड्याचे लिंग राणीच्या योनीजवळ आणी, आणि म्हणे की, मांडीवर मांडी ठेव, आणि लिंग योनीत घाल. स्त्रियांना लिंग जीव की प्राण आहे. लिंग भोकाला झवते, ते स्त्रियांना प्रिय असते; कारण ते योनी कुटते, आणि स्त्रियांच्या काळया भोकातील दाण्याला हाणते. हे नाटक झाल्यावर राणी म्हणते, बायांनो, मला कोणीच झवत नाही, सबब हा घोडा मजपाशी निजतो. त्यावर इतर स्त्रिया म्हणतात, रानात फाट्यांचा भारा उचलताना ढुंगण जसे पुढे करतात तशी तू आपली योनी पुढे उचल व तिचा मधला भाग वाढव, हे सर्व पट्टराणीने केले, तेव्हा घोडा निजला. मग, राणी इतर बायांना पुन: म्हणाली, बायांनो ! मला कोणीच झवत नाही, सबब मी घोड्याजवळ निजत्ये. त्यावर एका बाईने खालील टीका केली : हरणी रोजचे रानातले गवत टाकून शेतातले चोरून जव खाते, परंतु त्याने तिचे पोट भरलेले तिला वाटत नाही. शूद्र स्त्री वैश्याशी रमते, परंतु त्या रमण्याने तिचे समाधान होत नाही. ह्या टीकेला राणी उत्तर देते की, घोडा माझ्याशी संग करतो, त्याचे कारण एवढे की, दुसरे कोणीच मला झवत नाही. त्यावर दुसरी एक स्त्री टीका करते की तुझी ही योनी एखाद्या पाखरिणीसारखी ह्वळह्वळून हलते आहे, तिच्यात रेत पडले आहे व ती गुलगुल वाजत आहे, मग तक्रारीला जागा कोठे राहिली ? ह्याही टीकेला राणी उत्तर करते की, तक्रार करू नको तर काय करू ? मला कोणीच पुरूष झवत नाही. सबब मी घोड्यापाशी जात्ये. यावर तिसरी एक म्हणते, तुला घोडा सापडला हे नशीबच समज, तुझ्या आईला तोही लाभला नाही. तुझी आई व तुझा बाप झाडावर चढत आणि नंतर तुझा बाप, योनी सोलून काढितो म्हणून, तुझ्या आईच्या योनीत आपल्या हाताची मूठच ठाशी, त्याहून घोडा बरा नव्हे ? तैत्तिरीय संहितेतील मंत्राचा तपशील हा असा आहे. सायणाला ह्या मंत्राचा अर्थ व पूर्वापारसंबंध व शब्द बिलकुल काहीच कळले नव्हते.

(५) कृष्णयजुर्वेदसंहितेतील नाटकाचा तपशील हा असा आहे. आता शुक्लयजु:संहितेतील ह्याच नाटकाचा तपशील देतो. संज्ञापित घोड्यापाशी सर्व राजपत्न्या आल्यानंतर एकमेकींना म्हणतात की, बाई गे, मला कोणीच की गे धरून नेत नाही. हा घोडा देखील माझ्याशी न निजता कांपील नगरातील त्या सुभद्रीटलीशी रममाण झाला आहे. इतके म्हणून सर्व राजपत्न्या घोड्याचे येणेप्रमाणे आवाहन करतात : तू स्त्रीगणांचा पती आहेस, तू प्रियकरांतला प्रियकर आहेस, तू सुखनिधी आहेस, तेव्हा हे माझ्या वसो, मी तुझ्यापाशी येऊन गर्भ धारण करते, तू मजपाशी येऊन गर्भ घाल. आपण दोघेजण

चारी पाय पसरून व पांघरूण घेऊन, या स्वर्गासारख्या सुखकर स्थली निजू. तू रेत:संपन्न आहेस, तू माझ्या ठायी रेत घाल. राजपत्न्यांनी घोड्याची ही अशी प्रार्थना केल्यावर पत्न्यांचा पती जो राजा तो स्वत: घोड्याला कानगोष्ट सांगतो की, ह्या माझ्या पट्टराणीच्या मांड्या वर उचलून त्यांच्यावर तू आपल्या मांड्याच्या पाठीमागील भाग ठेव आणि हिच्या योनीत आपले शिश्न ढकल, कारण शिश्नावर स्त्रियांचा सर्व जीव व भोग अवलंबून असतो. यजमान जो राजा त्याचे स्वत:चे हे भाषण झाल्यावर यज्ञाचा मुख्य ऋत्विज जो अध्वर्यु तो राजपत्न्यांपैकी कुमारी म्हणून जी पत्नी तिच्या योनीकडे बोट करून म्हणतो, चांगले आहळ, चांगले आहळ, म्हणून ही तुझी योनी वसवसती आहे. सबब लिंग तुझ्या भोकात हाणतो म्हणजे तुझी योनी रेताने भरून जाऊन गलगल शब्द करील. अध्वर्युच्या ह्या वक्तृत्वाला उत्तर म्हणून कुमारी म्हणते, आहळ, आहळ, म्हणून हे तुझे लिंग हलते आहे, ते तुझे सच्छिद्र लिंग तुझ्या तोंडासारखे दिसत आहे, सबब फार तोंड करू नकोस. अध्वर्यु व कुमारी यांचे हे संभाषण झाल्यावर ब्रह्मा नामक याजक राजमहिषीला म्हणतो, तुझे आईबाप झाडावर चढत आणि मग तुझा बाप तुझ्या आईला म्हणे की, तुझी योनी माखून टाकतो आणि नंतर तिच्या योनीत आपले लिंग ठाशी. यावर महिषी ब्रह्माला म्हणते, तुझी आईबाप झाडावर चढून क्रिडा करीत. तेव्हा फार तोंड वासू नकोस, गप्प बैस. ब्रह्मा व महिषी यांच्यानंतर उदात्त नामक ऋत्विज व वावाता नामक राजपत्नी यांची सोंगे यज्ञभूमीवर येतात. यज्ञभूमीवर एक जवान होता. त्याला उद्गाता सांगतो की, ह्या वावातेला दगडावर टेकून जशी मोळी उचलतात तशी उचल म्हणजे हिची योनी वाऱ्यात धान्य पाखडताना अशी सुपली पुढे येते, तशी पुढे येईल. यावर यज्ञभूमीवर एक स्त्री उभी होती, तिला वावाता म्हणाली, या उद्गात्याला दगडावर टेकून जशी मोळी उचलतात तसा उचल म्हणजे याचे लिंग वाऱ्यात धान्य पाखडताना सूप जसे वर उचलले जाते तसे वर उचलेल. नंतर चौथा जोडा होता नामक ऋत्विज व परिवृक्ता नामक राजपत्नी यांचा रंगभूमीवर येतो. होता म्हणतो, हिच्या आखूड योनीत ठोले लिंग जेव्हा हा मनुष्य ठासतो, तेव्हा गाईच्या पावलांभर पाण्यातील जशी माश्यांची जोडी न बुडता बाहेर राहते तशी याच्या अंडांची जोडी हिच्या योनीबाहेर लोंबकळत रहाते. याला उत्तर म्हणून परिवृक्ता म्हणते, अहो तुम्ही शहाणे लिंगपूजक हो ! तुम्ही जेव्हा योनीत बुळबुळीत लिंग सारता, तेव्हा खरेच तुम्हाला सांगते की, तुमच्या मांड्याखालून योनी लिकलिकते. पाचवी जोडी क्षत्ता व पालागली यांची. क्षत्ता पालागलीला म्हणतो, हरीण रानातले गवत टाकून शेतातले जव जेव्हा चोरून खाते तेव्हा त्याला पोट भरलेसे वाटत नाही. शूद्र पुरूष वैश्य स्त्रीशी जेव्हा रममाण होतो तेव्हा त्याची तरी तृप्ती कोठे होते ?

(६) असे हे एकंदर नाटक व नक्कल आहे. ही नक्कल क्षुद्र व बीभत्स आहे हे अश्वमेध करणारे राजे व ऋत्विज जाणीत. दधिक्राव्णो अकारिषम् या मंत्रात आपण केले ते नाटक बीभत्स होते असे ते स्पष्टच कबूल करतात. परंतु हा बीभत्सपणा पूर्वपरंपरेला अनुसरून करणे अवश्य असल्यामुळे यज्ञपुरूष आपले बरेच करील, वाईट करणार नाही, अशी त्यांची खात्री होती. बीभत्स भाषणे केल्याबद्दल यज्ञ याजकाचा काय फायदा करीत असेल ते असो, समाजशास्त्रज्ञांचा मात्र या बीभत्स नाटकापासूनेक निश्चित फायदा होतो. त्यांना वैदिक ऋषींच्या रानटी पूर्वजांच्या चालीरीतींचे ज्ञान होते व ही बीभत्स भाषणे नमूद करून ठेवल्याबद्दल संहिताकाराचे ते ऋणी बनतात. यज्ञभूमीवर मैथुनविषयक बीभत्स नाटक पूर्वजापासून चालत आलेली परंपरा म्हणून वैदिक ब्राह्मण संभावित शिष्ट असत व असभ्य भाषा वापरण्याला भीत असत, परंतु यज्ञ प्रकरणात धार्मिक परंपरा म्हणून बीभत्स शब्द, हावभाव व वागणूक करणे त्यांना श्रेयस्कर व इष्ट वाटत असे. परंपरा म्हणून समाजात हे असले प्रकार अवशिष्ट राहतात व खपतात. उदाहरणार्थ, विवाहसमयी नवऱ्या मुलाच्या अंगावर पायतणे फेकण्याची कित्येक युरोपियनांची चाल, किंवा होळीत अवकट विचकट शब्द उच्चारण्याची ब्राह्मणादी हिंदूंतील चाल, किंवा लगतच्या दोन गावातील मुलींनी गावशिवेवर जाऊन एकमेकीचे बापजादे व आया माया उद्धरण्याची गावंढ्याची चाल. ह्या चाली परंपरा म्हणून चालत आलेल्या आहेत व समाजाला खपतात इतकेच. या चाली काय दाखवितात ? पुरातन युरोपियनांच्या एका टोळीतील पुरूष दुसऱ्या टोळीतील स्त्रीला बळजबरीने पळवून नेत असता, हिचे भाऊबंद त्या धर्षक पुरुषाला बडवीत, असे अनुमान पहिल्या चालीवरून आपण काढितो. होलाका म्हणून एक संस्था रानटी ऋषिपूर्वजांत असे. त्या संस्थेत ते रानटी पुरूष लिंग व योनी यांना अनुलक्षून टोळीतील सर्व स्त्रीपुरुषांची व्यंगे उघड स्पष्टपणे पुकारीत हे अनुमान दुसऱ्या चालीवरून निघते. कुणबी वगैरे गावंढ्यांच्या पूर्वजात तरूण कुमारिका एकमेकीच्या उखाळयापाखाळया काढून अभद्र भाषण करीत, असे अनुमान तिसऱ्या चालीपासून उद्भवते. हाच न्याय शिष्ट व संभावित अशा वैदिक ब्राह्मण-क्षत्रियाच्या रानटी पूर्वजांना लावावयाचा आहे. रानटी ऋषिपूर्वज यज्ञभूमीवर म्हणजे अग्निकुंडाभोवती म्हणजे धगधगीत धुमीच्याभोवती उबाऱ्याला जमत, लिंग व योनी यांचे वाचक शब्द एकमेकांना उद्देशून हरहमेश बोलत आणि नाकाडोळयांप्रमाणेच हे दोन्ही अवयव त्या रानटी लोकात उघडे असल्याने तत्संबंधाने गुह्य व गुह्योत्पन्न लज्जा उत्पन्न झालेल्या

नसल्यामुळे या अवयवांचे वाचक शब उच्चारण्यात कोणताच विपरीतपणा नाही असे समजून आपण सध्याचे लोक ज्यांना अश्लील म्हणतो ते शब्द सहजासहजी उच्चारीत. लिंग व योनी यांचे वाचक असे बीभत्स शब्द सध्याही पृथ्वीवरील कितीतरी रानटी लोकांच्या नित्याच्या बोलण्यात हरघडी येतात, हे समाजशास्त्राच्या अभ्यासकांना नवीन सांगावयास पाहिजे असे नाही. फार दूर जावयास नको, सध्या ज्या स्थली बसून मी लिहीत आहे, त्या स्थलाशेजारून भिल्ल, वडार, वंजारी, कुणबी इत्यादी कनिष्ठ दर्जाचे रानटाऊ लोक गाड्या हाकताना, बाजार करताना, लावण्या म्हणताना व शिळोप्याच्या गप्पा गोष्टी करताना मी पहात व ऐकत आहे. दर वाक्यास एकतरी अश्लील शब्द त्यांच्या बोलण्यात आला नाही, असे फारसे घडत नाही. ब्राह्मणादी उच्च व सभ्य लोकांशी बोलताना अश्लील भाषा तोंडातून काढावयास ते किंचित् भितात, परंतु आपापसात बोलताना त्या बोलण्याचा ताळतंत्र फारच थोडा असतो आणि हा असा प्रकार होणे अगदी स्वाभाविक आहे. उपजीविकेकरिता काबाडकष्ट करणे आणि करमणुकीकरीता जननेंद्रियांची आराधना करणे , या दोन विषयांइतका तिसरा विषय रानटी लोकांच्या परिचयाचा नसतो. हाच प्रकार रानटी ऋषिपूर्वजांचा असे. ह्या रानटी ऋषिपूर्वजांच्या बोलण्यांत जननेंद्रियांना अनुलक्षून फार शब्द सहजासहजी येत. हे रानटी ऋषिपूर्वज धुमीभोअवती जमत, जननेंद्रियांसंबंधाने ज्या अडचणी येत त्याचसंबंधाने संभाषण करीत, तेथेच गर्भाधानही उरकीत आणि या तिन्ही क्रियांना मिळून ते यज्ञ हा शब्द लावीत. अग्नीत टाकिलेल्या हविर्द्वारा देवांची आराधना करणे हा यज्ञाचा जो अर्थ वैदिक लोक लावीत, तो अर्थ रानटी ऋषिपूर्वजांना माहीत नव्हता. यज्ञ म्हणजे आगटीभोवती जमणे, काटक्या व मारलेल्या जनावरांची चरबी टाकून ती आगटी चेतवणे, सोमाची दारू पिणे, जननेंद्रियांसंबंधाने बोलणे करणे व मैथुन करणे, या क्रियासंततीला ते रानटी लोक यज्ञ हा शब्द लावीत. मूळ यज्ञ ह शब्द यज़ + न् असा होता यज् न् हे वाक्य होते. न् किंवा न्त हे अनेकवचनी प्रथमपुरूषवाचक सर्वनाम रानटी ऋषिपूर्वजांच्या भाषेत असे, क्रियाशब्दाच्या पुढे ते सर्वनाम योजीत. यज् न् या त्यांच्या वाक्याचा अर्थ ते यजतात, असा होता. यज् जा क्रियाशब्द दोन क्रियापदांचा जोड आहे. यज्, इज् या जोडक्रिया शब्दांत इ किंवा य या क्रियाशब्दाचा अर्थ गमन करणे, जाणे, जमणे असा होता व या क्रियाशब्दाचा अर्थ जन्मविणे, यभनक्रिया करणे असा होता. एका ठीकाणी जमून यभनक्रिया किंवा जननक्रिया करणे या जोडक्रियेला यज् किंवा इज् हा जोडक्रिया शब्द त्यांच्या भाषेत होता. तात्पर्य, यज्ञ म्हणजे ते जमतात व यभनक्रिया करतात असा यज्न् या वाक्याचा अर्थ त्या रानटी लोकांत होता. ह्या यज् न् वाक्याचा उच्चार असा कालांतराने झाला व रानटी लोकांची प्राथमिक भाषा मेल्यावर यज्ञ हे वाक्य नाम म्हणून पुढील भाषेत प्रचलित झाले. कालांतराने रानटी ऋषिपूर्वजांचे वंशज उत्तरोत्तर सुधारत गेले, घरेदारे करू राहू लागले व मैथुनक्रिया यज्ञभूमीवर म्हणजे जमातीच्या उघड्या जागेवर लोकान्तांत न करता एकान्तांत करू लागले. त्या सुधारलेल्या वंशजात इंद्र, वरूण, सूर्य यांची आराधना अग्नीत हवि टाकून करण्याची पद्धती निर्माण झाली. अग्नी व अग्नीकुंड हे आर्यसंस्कृतीचा मूळ उगम. सबब देवांची आराधना ही अग्नीच्या व अग्नीकुंडाच्या सान्निध्याने व द्वारा सहज होऊ लागली व पूज्य बापजादे जी जी कार्ये अग्नीभोवती उरकीत ती ती सर्व कार्ये तशीच तशीच अग्नीसमक्ष उरकण्याने इष्टकाम सिद्धी बापजाद्यांना जशी पूर्वी मिळाली तशी सध्याही आपणाला मिळेल अशी भावना सहजच चालू राहीली. बापजादे आगटीभोवती एकत्र जमत, अभद्र शब्द उच्चारीत व तेथेच यभनक्रिया उरकीत, सबब त्यांचे सुधारलेले वंशजही यज्ञप्रक्रियेत अग्नीजवळ जमण्याची, अभद्र शब्द उचारण्याची व यभनक्रिया करण्याची नक्कल अश्वमेधयज्ञात जशीच्या तशी उठवून देत. रानटी बापजाद्यांना आगटीभोवती यभनक्रिया करून खरीच पुत्रसंतति मिळे, तशीच पुत्रसंतति बापजयांची यज्ञभूमीवर नुसती नक्कल केल्याने आपणास मिळेल अशी भावना वैदिक ब्राह्मणक्षत्रियांची असे. अश्वमेध यज्ञ केला म्हणजे वीरप्रजा हटकून मिळेल किंवा पंचहविरूपेतचयन केले म्हणजे हजार पुत्र मिळतील, अशी श्रद्धायुक्त भावना वैदिक ऋषींची असे. पूर्वजांनी अग्नीची अशी अशी उपासना करून अशी अशी इष्टसिद्धी करून घेतली, सबब ज्याला ज्याला तशी इष्टसिद्धी हवी असेल त्याने त्याने तशी आराधना करावी असा उपदेश यजुर्वेदात बहुतेक प्रत्येक इष्टीच्या व यज्ञाच्या मंत्रात केलेला आढळतो. एतत्संबंधाने तैत्तिरीयसंहितेच्या पाचव्या कांडातील सहाव्या प्रपाठकाच्या पाचव्या अनुवाकातील खालील वाक्य मासल्याकरता देतो :-

ऐतं वै पर आट्णार : कक्षीवाॅ<br>
औशिजो वीतिहव्य: श्रायसस्त्रसदस्यु:<br>
पौरूकुत्स्य: प्रजाकामा अचिन्वत ततो<br>
बै ते सहस्त्रँ सहस्त्रं पुत्रानविन्दंत । इ.

अट्णाराचा मुलगा पर, उशिजाचा मुलगा कशीवान्, श्रयसाचा मुलगा वीतिहव्य व पुरूकुत्साचा मुलगा त्रसदस्यु यांनी पुत्रसंततीच्या इच्छेने पंचहविर्युक्त चयन केले, त्यामुळे त्या प्रत्येकाला एकेक हजार पुत्र मिळाले, सबब पंचहविर्युक्त चयन जो कोणी करील त्यालाही तीच प्राप्ती होईल.

यज्ञभूमीवर पंचहविर्युक्त चयन करून पर, कक्षिवान्, वीतिहव्य, व त्रसदस्यु या चौघांना हजार हजार पुत्र कसे मिळाले ? पंचहवि दिल्याबरोबर आकाशातून एकदम एक हजार पोरे पडली की भूमीतून वर आली ? खरा प्रकार असा असे. शत्रूशी लढण्याला व स्वारी शिकारीची कामे करण्याला प्रजापती म्हणून जे यूथपती असत त्यांना तरूण जवानांची पराकाष्ठेची जरूर भासे. यज्ञ करून म्हणजे शेजारच्या जवानांची जमात करून व त्यांचा स्वयूथातील स्त्रियांशी समागम करून देऊन, करवेल तितकी जास्त प्रजा यूथातील स्त्रियांच्या ठायी हे प्रजापती उत्पन्न करून घेत, त्या प्रजेचे संगोपन करीत व आपले मनुष्यबळ वाढवीत. शत्रूंना जिंकून व दास करून मायेची प्रजा वाढावी तितकी वाढत नसे. सबब यज्ञ म्हणजे जमात करून पोरे उत्पन्न करण्याची प्रजापतींची ही पद्धत असे. प्रजापतिर्यज्ञं असृजत, प्रजापतिः प्रजाः असृजत इत्यादी जी वाक्ये तैत्तिरीयसंहितेत येतात त्यांचा अर्थ एवढाच आहे की धुमीभोवती जमात जमवून प्रजापती प्रजा उत्पन्न करून आपले मनुष्यबळ वाढवीत. धुमीभोवती प्रजोत्पादनादिक्रियार्थ एके ठिकाणी जमणे असा यज्ञ या शब्दाचा मूळ अर्थ रानटी ऋषिपूर्वजांच्या भाषेत होता. तोच यज्ञ हा पूर्वपरंपरागत वडिलार्जित शब्द रानटी ऋषिपूर्वजांचे सुधारलेले वेदकालीन वंशज अग्नीत हवी देऊन इष्टकामना सिद्ध्यर्थ देवांना आराधिणे या अर्थाने योजीत. अग्नी व यज्ञ या दोन वस्तूंचा असा हा इतिहास आहे. यज् न् ते जमून प्रजोत्पादन करतात, असा यज्ञ या शब्दाचा जसा मूळार्थ आहे, तसाच यजुस् या शब्दाचाही आहे. यज् या जोड धातूपुढे उस् अथवा उर् हे सर्वनाम आहे. न् ( अन्, न्त ) हे जसे प्रथम पुरूषाच्या अनेकवचनाचे सर्वनाम आहे, तसेच ते च उर् किंवा उस् हे ही प्रथम पुरूषानेकवचनार्थक सर्वनाम आहे. यजुस् म्हणजे ते यजतात. यज्ञ व यजुस् ही वाक्ये मुळातच अनेकवचनी असल्यामुळे अनेक लोकांनी जमून अग्निद्वारा ईश्वरोपासना करणे असा त्यांचा अर्थ आहे. इष्टि हा शब्द इज् ( यज् ) + ति असा मुळात वाक्यात्मक होता. इज् + ति म्हणजे तो अग्नीजवळ जाऊन प्रजोत्पादन करत, असा एकवचनार्थक प्रयोग मुळात होता. इज + ति या वाक्यापासून ज् चा ष् होऊन इष्टि हा वैदिक शब्द जन्मास आलेला आहे. तात्पर्य, यज्ञ यजुष्, इष्टि या तिन्ही शब्दांचा मूलसंबध आगटीभोवतालील प्रजोत्पादनकर्माशी होता. सबब, विवाहादी प्रजोत्पादनसंबंधक विधानात अग्नीची समक्षता वैदिक ऋषींना परंपरागत म्हणजे पूज्य म्हणून अत्यावश्यक वाटे.

(७) अग्निचयन व प्रजोत्पादन यांचे साहचर्य रानटी ऋषिपूर्वजांत किती पराकाष्ठेचे निकट होते ते तैत्तिरीय संहितेतील एक उतारा देऊन आणिक स्पष्ट करितो.

नाग्निं चित्वा रामां उपेयाद्
अयोनौ रेतो धास्यामीती,
न द्वितीयं चित्वा अन्यस्य स्त्रियं
उपेयान् , न तृतीयं चित्वा
कांचन उपेयाद, रेतो वा एतन्नि
धत्ते यदग्निं चिनुते, यदुपेयाद्रेतसा व्यृध्येत.
( तैत्तिरीयसंहिता, ५ कांड, ६ प्रपाठक, ८ अनुवाक )

एका ऋषीचे मत असे होते की, पहिल्यांदा अग्निचयन केले असता, स्त्रीसमागम करू नये, कारण अनुपयुक्त स्त्रीच्या ठायी रेत स्थापिण्यात काही मतलब नाही, दुसऱ्यांदा अग्निचयन केले असता दुसऱ्यांच्या स्त्रीशी गमन करू नये, आणि तिसऱ्यांदा अग्निचयन केले असता कोणत्याच स्त्रीशी गमन करू नये; निषेधाचे कारण असे आहे की, अग्निचयन करणे म्हणजे रेत साठविणे आहे, तेव्हा स्त्रीसमागम केला असता रेताचा व्यर्थ क्षय होतो.

वरील निषेधांत स्वतःच्या मालकीच्या स्त्रीशी ती अनुपयुक्त योनी असता दुसऱ्यांच्या मालकीच्या स्त्रीशी व स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या कोणाच्याही मालकीची नाही अशा कोणत्याही स्त्रीशी अग्निचयनानंतर समागम करू नये, असे सांगितले आहे. म्हणजे हा निषेध प्रस्थापित होण्याच्या पूर्वी अग्नी सिद्ध केला असताही स्वस्त्रीशी किंवा दुसऱ्याच्या स्त्रीशी किंवा कोणत्याही स्त्रीशी समागम केला असता चाले, असा गर्भितार्थ निघतो. हा निषेध प्रस्थापित होण्याच्या पूर्वी चाल अशी असे की, अग्निकुंडाजवळ प्रजापती स्वस्त्रियांशी समागम करत, किंवा कोणाच्याच मालकीच्या माहीत अशा दासस्थितीतील दासीशी समागम करीत. एके काली अशी स्थिती होती. पुढे नीतिमत्ता वाढून, स्वपरभाव

वृद्धिंगत होऊन काही सज्जनांना असे वाटू लागके की, पवित्र म्हणून मानिलेल्या अग्निकुंडावर स्वस्त्रीशी किंवा दुसऱ्याच्या स्त्रीशी समागम करणे नीतिमत्तेचे नव्हे. तेव्हा काही लोकांनी आपल्या अग्निचयनप्रक्रियेत स्त्रीसमागम निषिद्ध मानला, परंतु हा निषेध समाजातील सर्वच व्यक्तींना पसंत पडला असे नाही. काही लोकांचे असे म्हणणे पडले की, अग्निकुंडावर उबाऱ्याच्या जागी येऊन व स्वस्त्रीसमागम करून आपली प्रजावृद्धी होत्ये व मनुष्यबळ वाढते, तेव्हा अग्निकुंडावर स्त्रीगमन करणे आपल्या समाजाच्या मनुष्यबळाला उपकारक आहे, सबब वरील निषेध अनुपकारक अतएव अमान्य समजावा. येणेप्रमाणे समाजात दोन पक्ष झाले, (१) अगमनपक्ष व (२) गमनपक्ष. गमन-पक्षाची विचारसरनी येणेप्रमाणे होती :-

अथो खलु आहु: अप्रजस्यं तद्
यन्नोपेयादिती, तस्मादुपेयाद्रेतस:
अस्कंदाय ( ५ कांड, ६ प्रपाठक, ८ अनुवाक )

आता यावर असे म्हणतात की, समागम केला नाही तर प्रजा खुंटेल, म्हणून रेत वाया जाऊ देऊ नये याकरीता उपगमन करावे.

येणेप्रमाणे गमन पक्षाचे म्हणणे पडले की, अग्निचयन केल्यावरही स्वस्त्रीशी, दुसऱ्याच स्त्रीशी किंवा वाटेल तिशी गमन करण्यास हरकत नाही. या विधिनिषेधरूप मंत्राचे प्राकृत विषयाला उपयोगी असे तात्पर्य एवढेच घ्यावयाचे आहे की, रानटी ऋषिपूर्वज आगटीच्या उबाऱ्यात प्रजोत्पादन करीत असत.

(८) अग्नी व प्रजोत्पादन यांचा नित्यसंबंध दाखविणारी हवी तितकी वाक्ये ऋग्वेद व यजुर्वेद यांच्यातून काढून दाखविता येतात. प्रजननं ज्योति: ( तै. सं. कांड ७, प्रपाठक १, अनुवाक १ ) या वाक्यात पुरूषजननेंद्रियाला अग्नीची ज्योत म्हटले आहे. गर्भो वा एष यदुख्य: ( तै. सं. ५-६-१० ) या वाक्यात अग्नीला गर्भ म्हटले आहे. गर्भ, योनी, रेत, मुष्क, अंजि, प्रजनन, प्रजापती, मेंद्र, इंद्रिय, वृष, वृषण, वृषभ, वीर्य इत्यादी शब्द ज्यांचा उच्चार करणे आपणा सर्वांनाच अश्लील व असभ्य वाटते- ते शब्द: यजु:संहितेत अग्नीच्या सानिध्याने पदोपदी आलेले आढळतात. प्रजोत्पादक इंद्रिये ही अग्नी आहेत, अशी रानटी ऋषिपूर्वजांची कल्पना असे. शिवाय रानटी ऋषिपूर्वज यभनकर्म उघड्यात सर्वांदेखत करीत, त्यात काही लज्जास्पदता त्यांना वाटत नसे. अर्थात् यभनक्रियेचे वाचक शब्द व अवयव यांचा उच्चार करण्यात कोणताही अश्लीलपणा आहे, असे त्यांना वाटत नसे. नाक, डोळे ही उघडी ठेवण्यास आपणास जशी लाज वाटत नाही, त्याप्रमाणेच जननेंद्रिये उघडी ठेवणे रानटी ऋषिपूर्वजांना लज्जेची गोष्ट वाटत नसे. म्हणजे रानटी ऋषिपूर्वज एकेकाली बरेच नग्न असत व जननेंद्रिये, रेत, गर्भ इत्यादीवाचक शब्द त्यांच्या बोलण्यात हरघडी येत. तैत्तिरीय संहितेच्या पहिल्या कांडाच्या पाचव्या प्रपाठकाच्या नवव्या अनुवाकांत अग्नी, योनी व लिंग याजसंबंधाने ऋषिकल्पना अर्थात् ऋषिपूर्वजकल्पना काय होत्या ते सांगितले आहे.

अग्निहोत्रं जुहोति, यदेव किं च
यजमानस्य स्वं तस्यैव तत् । रेत:
सिंचति प्रजनने प्रजननं हि वा अग्नि: ।
यत्साहं जुहोति रेत एव तत्सिंचति ।
प्रैव प्रातस्तनेन जनयति तत् ॥

या वाक्यांचा भावार्थ असा : अग्निहोत्री यजमान अग्नीत दूध, दही, तूप वगैरे पदार्थ टाकतो ते फुकट जात नाहीत. योनींत टाकलेले रेत ज्याप्रमाणे तेथे जमा होते त्याप्रमाणे अग्नीत टाकलेले पदार्थ रेतोरूप होतात, कारण अग्नी म्हनजेच जननेंद्रिय. सायंकाळी हवन करणे म्हणजे रेतसिंचन करणे आहे, आणि प्रात:काळी हवन करणे म्हणजे सायंसिक्त रेतापासून झालेली प्रजा संपादणे आहे.

यज्ञभूमीवर ऋषिपूर्वजकाली काय प्रकार चाले तो विशद करणारे आणिक एक वाक्य तैत्तिरीय संहितेच्या सातव्या कांडाच्या पाचव्या प्रपाठकाच्या दहाव्या अनुवाकातील देतो :

यंति वा एते मिथुनाद् ये
संवत्सरं उपयंति अंत: वेदि

मिथुमो सं भवत: तेनैव मिथुनान्न यंति ।

ह्या मंत्राचा भावार्थ असा आहे की, जे यजमान संवत्सर सत्राचे अनुष्ठान करतात त्यांची मैथुनशक्ती मंद होते, कारण वर्षभर ते ब्रह्मचर्याने राहतात. करिता मैथुनशक्ती पुन: प्रज्वलित व्हावी एतदर्थ ईश्वराच्या अघटीत लीलेने बेदीच्या मध्ये एक जोडपे उत्पन्न होते. ते जोडपे कोणाचे म्हणाल तर एका ब्रह्मचाऱ्याचे व एका छिनाल वांडकीचे. त्या जोडप्याचा मैथुनव्यवहार पाहिला म्हणजे वर्षभर ब्रह्मचर्याने राहिलेल्या यजमानाची मैथुनशक्ती पुन्हा पूर्ववत् जोराने प्रगट होते. मैथुन या भाववाचक नामाचे कार्य मिथुन हा शब्द तैतिरीय संहितेत करतो.

यजमानाने वर्षभर ब्रह्मचर्याने राहावयाचे व्रत वैदिककाळी निघाले. तत्पूर्वी वेदीवर म्हणजे आगटीभोवती म्हणजे जमातींच्या जागी स्त्रियांच्या पाठी लागणारे पुरूष व पुरुषांच्या पाठी लागणाऱ्या स्त्रिया यथेच्छ रममाण होत. ज्या मालकाची आगटी असेल त्याच्या स्त्रिया आलेल्या पाहुण्याशी रममाण होत, व तोपर्यंत स्वत: यजमान अतिथीसत्कारार्थ स्वत: ब्रह्मचर्याने राही. अतिथीला स्वस्त्री समर्पण करण्याची जी चाल वैदिक ऋषिलोकांत पुढे चालू होती तिचे दर्शक यजमानाचें हे काही कालपर्यंतचे ब्रह्मचर्य होय.

(९) रानटी ऋषिपूर्वज आगटीच्या भोवतील जमातीच्या जागी केवळ प्रजोत्पादन कर्म करूनच स्वस्थ बसत नसत. तेथे ते मादक सोमरस पीत, गाणी गात व नाचत बागडत. रानटी ऋषिपूर्वजांच्या गाण्यापासून पुढे त्रिष्टुभू, अनुष्टुभू, गायत्री इत्यादी छंद निघाले व सामगायन म्हणून ज्याला पुढे संज्ञा मिळाली ते गान उत्पन्न झाले. रानटी नाचण्यापासून पुढे नृत्यकला उद्‌भवली, आणि रानटी पूर्वजांच्या चालीरीतीची जी नक्कल वैदिक काली साक्षेपाने होऊ लागली त्या नकलेपासून नाटक किंवा नाट्यकला म्हणून जिला पुढे प्रौढ नामाभिधान मिळाले ते जन्मास आहे. अश्वमेध यज्ञातील घोड्यापुढील राजस्त्रियांचा विलाप अथवा विलास आणि त्या विलासातील स्त्रीपुरूषांची संभाषणे, हे एक छोटेसे बीभत्सरसात्मक नाटकच आहे. अश्वमेधाची समाप्ती करताना आरतीची जेव्हा वेळ येते, तेव्हा ऋत्विज ऋचा म्हणतात, स्त्रिया गाणी गातात व दासी नृत्य करतात. डोक्यावर मद्याच्या घागरी घेऊन पायानी ताल धरीत धरीत इदं मधु ( हे मद्य ) हे शब्द गात गात आठ दासी यज्ञभूमीवर येतात, तेव्हा यजमानाला आपण मोठे पुण्यवंत व भाग्यशाली आहोत अशी कृतकृत्यता वाटली म्हणून तैत्तिरीय संहितेत लिहिलेले आढळते ( कांड ७, प्रापाठक ५, अनुवादक ११. शेवट ).

(१०) भारतीय आर्यात विवाह अग्नीच्या सामक्ष्याने कां व्हावा लागतो ते वरील तपशिलावरून स्पष्ट होते. कोणत्याही समाजातील विवाहाचे मुख्य प्रयोजन जे प्रजोत्पादन ते रानटी ऋषिपूर्वज आगटीभोवतील यज्ञकुंडावर म्हणजे जमातीच्या जागी करत. सबब त्यांचे वंशज जे वैदिक व सद्य:कालीन भारतवर्षीय आर्य तेही आपले विवाह तातस्य कूपं या न्यायाने अग्नीसमक्ष करतात.

## परिशिष्ट

( कृष्णयजु: संहिता, कांड ७, प्रपाठक ४, अनुवाक १९ )

(१) अंबे अंबाल्यंबिके न मा नयति कश्चन । हे अंबे, हे अंबालि, हे अंबिके, मला कोणीही नेत नाही.

टीका :- या मंत्राचे तीन पाठभेद आहेत. एक पाठ कृष्णयजु: संहितेतील, दुसरा पाठ यजु: संहितेतील व तिसरा

पाठ पाणीनीय अष्टाध्यातील.

यातील कृष्णपाठ - अंबे अंबाल्यंबिके

शुक्लपाठ - अंबे अंबिकेऽबालिके

पाणिनिपाठ - अंबे अंबाले अंबिके

अंबे व अंबिके ही दोन रूपे तिन्ही पाठांत एकसारखी आहेत. अंबे हे रूप तिन्ही पाठांत पाहिले आहे. अंबिके हे रूप कृष्णपाठात व पाणिनीय पाठात शेवटचे आहे व शुक्लपाठांत दुसरे आहे. कृष्णपाठात अंबालि असे रूप व पाणिनिपाठात अंबाले असे रूप आहे. अंबालि हे अंबाली शब्दाचे संबोधन आहे. अंबाले हे अंबाला किंवा अंबालि या शब्दाचे संबोधन आहे व अंबालिके हे अंबालिका शब्दाचे संबोधन आहे. शब्दरूपात व पाठक्रमात हे असे तीन प्रकार आहेत. यावरून स्वच्छच अनुमान निघते की, यजु:संहिता शुक्ल असो, कृष्ण असो, तिचे पाठ नियत नाहीत. म्हणजे यजु:संहिता शुक्ल व कृष्ण अशी जी सध्या उपलब्ध आहे ती मूळ जशी रचली गेली असेल तशीची तशी आपल्यापर्यंत पोहोचली नाही. तिच्यातील शब्दात व शब्दक्रमात रुपांतरे झालेली आहेत. शिवाय, पाणिनीय सूत्रावरून

( ६-१-११८ ) असेही दिसते की, पाणिनीला यजु:संहितेत स्वरसंधीच्यासंबंधी जे नियम माहीत होते ते नियम सध्या उपलब्ध असलेल्या कृष्ण यजु:संहितेत व शुक्ल यजुसंहितेत यद्यपि पाळिलेले आहेत तथापि युक्तीने पाळले आहेत.

आपो जुषाणो इत्यादी सूत्रात पाणिनी सांगतो की, अंबे, अंबाले, अंबिके या तीन शब्दांतील आद्य अकारापूर्वी एकार आला असता पूर्वरूप एकादेश यजुषि होत नाही. प्रकृतिभावच राहतो, म्हणजे संधी होत नाही. या नियमाप्रमाणे पाणिनीला संमत असलेल्या यजु:संहितेत अंबे अंबाले अंबिके असा संधिरहित पाठ होता. तो पाठ सध्याच्या कृष्णयजु:संहितेत म्हणजे तैत्तिरीय संहितेत अंबे अंबाल्यंबिके असा फिरवून म्हणजे  अंबालेच्या ऐवजी अंबालि असे संबोधक रूप घालून, पाणिनीय उपदेशाची अवहेलना केलेली स्पष्ट दिसत आहे. पाणिनीने अंबे, अंबिके व अंबिके अशी तीन रूपे सांगितली आहेत, त्यांचा अर्थ सध्यांच्या तैत्तिरीयसंहिताकारांनी असा केला की अंबाले हे रूप असेल तरच पुढील अकाराचा पूर्वरूप -एकादेश होईल, अंबालि असे ज्या अर्थी आमचे रूप आहे त्याअर्थी हा नियम आम्हाला येथे लागूच नाही. पाणिनीय नियम टाळण्याची ही अशी चोरवाट नवीन तैत्तिरीयसंहिताकारांनी काढली खरी, परंतु पाणिनीच्या कचाट्यातून ह्या कच्च्या गुरूंच्या चेल्यांना निसटता आले नाही. अंबालि असे रूप मानून अंबाल्यंबिके असा संधी त्यांना उजळ माथ्याने करता आला, परंतु अंबे व अंबालि या शब्दाचा प्रकृतिभाव ठेवून म्हणजे संधी न करून त्यांनी आपले हसे करून घेतले.

***********